संगीत

# राजसंन्यास

लेखक

कै. राम गणेश गडकरी

किंमत दोन रुपये

~~~~~~~~~~

**ऋणनिर्देश**

राजसंन्यास हें नाटक प्रथम रंगभूमीवर आणलें त्या वेळीं ज्या लोकप्रिय नटांनीं भूमिका केल्या होत्या त्यांच्या दुर्मिळ छायाचित्रांचा या आवृत्तींत समावेश करणें अगत्याचें तसेंच औचित्याचें होतें. "मराठी रंगभूमि" या आगामी चित्रपटासाठीं श्री. के. टी. देशमुख यानीं परिश्रमपूर्वक दुर्मिळ अशा छायाचित्रांचा जो चित्रसंग्रह केला आहे त्यामधून त्यांनीं आम्हांला या आवृत्तीसाठीं कांहीं सुंदर छायाचित्रें दिली त्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

—प्रकाशक

प्रकाशक :
गो. य. राणे
नेर्लेकर बुकसेलर्स यांचेकरितां
बुधवार चौक
पुणें २

मुद्रक :
चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय
' शिव-पार्वती '
४६१।१० सदाशिव, टिळक रोड
पुणें २
~~~~~~~~~~

# संगीत राजसंन्यास नाटक

## पात्रें

१ **छत्रपति संभाजीमहाराज.**

२ **साबाजी शिर्के :** } — शिवाजीमहाराजांना ज्यांनीं अंगाखांद्यावर
३ **हिरोजी फर्जंद :** } खेळविलें असे ८० वर्षांचे एकनिष्ठ इमानी सेवक.

४ **दौलतराव**:—साबाजीचा पुत्र व दर्यासागर.

५ **रायाजी**:—तानाजी मालुसऱ्याचा पुत्र व मराठ्यांचा सेनासागर.

६ **कलुषा कबजी**:-मुख्य प्रधान.

७ **जित्राजी कलमदाने**:—कलुषाच्या हाताखालचा कारकून.

८ **देहू दप्तरी**:-पहिलवानी पेशाचा एक उनाड पोऱ्या.

९ **चिटणीस**:—खंडोबल्लाळ; बाळाजी आवजींचे चिरंजीव.

१० **येसूबाई**:—महाराणी.

११ **तुळशी**:—हिरोजी फर्जंदाची मुलगी व दौलतरावाची पत्नी.

१२ **शिवांगी**:—रायाजीवर आषक्त झालेली एक बाला.

१३ **चांदणी**:—देहूचें प्रेमपात्र.

याशिवाय बाळराजे शाहू, औरंगजेब, रोषनआरा बेगम, अहंमद, मंजुळा, मोरे, माने व इतर नोकर, शिपाई.

प्रवेशांच्या आरंभीं व शेवटीं सांपडलेल्या तारखांवरून

## राजसंन्यासचा लेखनकाल

| अंक व प्रवेश | सुरुवात | संपूर्ण | स्थळ |
|---|---|---|---|
| अंक १, प्र. १ | | ता. ५।११।१६ सायंकाळ. | नाशिक |
| अंक १. प्र, २ | | ता. ७।१।१७ दुपारीं ३॥ वाजतां. | जळगांव |
| अंक ५, प्र. १ | ता. ४।९।१६ दुपारीं १२॥ | ता. ८।९।१६ सायंकाळ ८ वा. ५० मि. | पुणें |
| अंक ५, प्र. २ | ता. ८।९।१६ सायंकाळ ८ वा. ५० मि. | ता. ८।९।१६ सायंकाळ ९ वा. | पुणें |
| अंक ५, प्र. ३ | ता. ८।९।१६ रात्रौ ९ वा. ३० मि. | ता. ८।९।१६ रात्रौ ९ वा. २० मि. | पुणें |
| अंक ५, प्र. ४ | | ता. १०।९।१६ रात्रौ १० वा. | पुणें |
| अंक ५, प्र. ५ | | ता. २३।६।१६ सायंकाळ. | मुंबई |

राजसंन्यास नाटकाच्या अपूर्ण भागांतील

# कांहीं मुख्य प्रवेशांची साधारण कल्पना

[ कै. राम गणेश गडकरी यांच्या उपलब्ध असलेल्या संक्षिप्त टांचणांच्या आधारानें व त्यांनीं स्वतः आपल्या मित्रमंडळींना संविधानकासंबंधीं वेळोवेळीं जी माहिती सांगितली, तिजवरून कांहीं कांहीं मुख्य प्रवेशांची अगदीं स्थूलमानानें कल्पना देण्याचा प्रयत्न केला आहे. ]

## नाटकाची नांदी

मुख्य पडदा उघडताच आंत झिरझिरीत जाळीदार पडदा दृष्टीस पडतो. त्यामधून पलीकडे मालवणच्या सिंधुदुर्गासमोरील समुद्राचा देखावा दिसत आहे. सूर्य मावळण्याचा सुमार असून दर्या तुफान खवळलेला आहे. लाटांतून उसळणाऱ्या तुषारानीं हिममय झालेल्या वातावरणात मराठी रियासतीभोंवतीं जागत्या डोळ्यानीं पहारा करीत असलेल्या पाच देवींच्या अस्पष्ट आकृति शिवनेरीच्या बाळाला निजविण्यासाठीं 'पाळणा' गात आहेत असा अद्भुतरम्य देखावा नजरेस पडतो. 'पाळणा' गाऊन संपल्यावर देवता नाहींशा होतात व जाळीदार पडदा दूर होऊन पहिल्या प्रवेशास सुरुवात होते.

## पंचारतीचा प्रवेश

(अंक १, प्रवेश ५)

पहिल्या अंकाच्या आरभीं संभाजीराजे तुळशीला घेऊन रायगडावर आले आहेत. त्यानंतर, तिच्या सौंदर्याच्या मोहनबाधेनें धुंद होऊन राजे आपला सर्व वेळ तुळशीबरोबर नाना प्रकारचे विलास करण्यांत घालवूं लागले. प्रस्तुत प्रवेशांत, रायगडावरील गंगासागर तलावात जलक्रीडा करण्यासाठीं ते उभयता गेले आहेत. हें वृत्त येसूबाईसाहेबांस कळतांच, राजांना ओंवाळण्यासाठीं पंचारती घेऊन त्या तलावाच्या काठावर आलेल्या आहेत. जलक्रीडा संपवून राजे तुळशीसहवर्तमान होडींतून कांठावर पाय ठेवितात तों पंचारती घेऊन आपणांला ओंवाळण्यासाठीं येसूबाईसाहेब उभ्या आहेत असें त्यांना दिसतें. त्याबरोबर त्यांच्या नजरेवरची विलासी निशा एकदम उतरते व 'ही पंचारती ओंवाळण्याचें

काय कारण?-' असें ते चपापून येसूबाईंना विचारतात. मनाची शांतता यत्किंचितहि ढळूं न देतां स्वभावसहज विनयानें व गांभीर्यानें येसूबाई उत्तर देतात कीं, ' अद्‌भुत पराक्रम गाजवून परत घरीं येणाऱ्या वीराला पंचारतीनें ओंवाळण्याचा भोंसल्यांच्या कुळांत रिवाज आहे. शहाजीराजे दौलताबादच्या दरबारीं वजिरी मिळवून परत आल्यावर जिजाबाईमातोश्रींनीं त्यांची पंचारतीनें ओंवाळणी केली. थोरले राजे दिल्लीच्या बंदिवासांतून स्वदेशीं परत आल्यावर रायगडीं पाऊल ठेवितांच सईबाईसाहेब पंचारती घेऊन सामोऱ्या गेल्या. भोंसल्यांच्या कुळांत कोणीं केला नव्हता असा अलौकिक पराक्रम करून आज आपण परत आलां आहांत! काशीची गंगा व रामेश्वरचा सागर एकवटून थोरल्या महाराजानीं रायगडावरील राष्ट्रतीर्थ-हा गंगासागर निर्माण केला, तो आपल्या पराक्रमानें आपण पावन केलांत; यासाठीं ही पंचारती आपणांवरून मी ओंवाळीत आहें!' हें जलाल अंजन डोळ्यांत पडताच राजांची धुंदी साफ उतरते व आत्मत्वाची जाणीव उत्पन्न होऊन त्यांना आपल्या करणीची किळस वाटूं लागते आणि त्याबरोबर ' तूं वाट फुटेल तिकडे जा ' असें ते तुळशीला त्वेषानें सांगतात. तुळशी निघून जाते. या ठिकाणीं पहिला अंक समाप्त होतो.

## दौलतरावाच्या मृत्यूचा प्रवेश
(अंक २, प्रवेश १)

दौलतरावाच्या संसाराची राख करून त्याच्या बायकोला आपली राख बनविणाऱ्या संभाजीराजावर, या विश्वासघाताबद्दल भयंकर सूड उगविण्यासाठीं दर्यासागराच्या पदावर लाथ मारून दौलतराव मोगलांना मिळण्यासाठीं निघतो. त्याचे वडील साबाजी त्याला वाटेंत अचानक भेटतात. आपण संभाजीवर सूड उगविण्यासाठीं मोगलांना मिळावयास चाललों आहोंत असें दौलतराव साबाजीला सांगतो. त्यावर ' राजाकडून व्यक्तिस्वरूपांत घडलेल्या अपराधाबद्दल त्याच्या सार्वजनिक स्वरूपाला अपाय करण्यांत अर्थ नाहीं व स्वतःच्या संसाराची राखरांगोळी झाली तरी बेहत्तर पण अलम मराठेशाहीचा संसार शाबूत राखण्यासाठीं मराठी छत्राखालीं एकनिष्ठ राहणें हें मराठ्यांचें कर्तव्य आहे ' असें साबाजी त्याला बजावितो; पण सूडाच्या कल्पनेनें दौलतराव इतका खवळून गेलेला असतो कीं, तो ' केवळ मराठेशाहीच्या इमानाचाच

काय, पण मी महाराष्ट्रधर्माचा सुद्धां संन्यास करीन; पण संभाजीचा सूड उगविल्याविना राहणार नाहीं!' असें उत्तर देतो. पोटच्या पोराचे हे नादान शब्द ऐकतांच साबाजीला त्वेष चढतो व ''महाराष्ट्रधर्माचा संन्यास करीन' असे बोल जातिवंत मराठा जीव गेला तरी ओंठाबाहेर काढणार नाहीं; आणि मराठेशाही मातीला मिळविण्याच्या कल्पनेनें ज्याअर्थी तूं असे शब्द उच्चारून शिर्क्यांच्या आजपर्यंतच्या इमानी अब्रूवर काळोखी आणीत आहेस त्याअर्थी असली कमअस्सल अवलाद जिवंत ठेवणें पाप आहे!' असें म्हणून तो दौलतरावाला वार करितो. इतक्यांत, संभाजीराजांच्या सहवासांत अंतर पाडून आपल्या विलासी सुखांत विष कालविल्याबद्दल चवताळलेली तुळशी, येसूबाईवर कसा सूड घ्यावा याचा विचार करीत त्या ठिकाणीं येते; तों मरणोन्मुख होऊन पडलेला आपला पति दौलतराव तिच्या दृष्टीस पडतो. दौलतरावाच्या देहाची ती दारुण दैना पाहून तुळशीचें व्यभिचारित पतिप्रेम पुन्हा जागृत होतें व 'मराठेशाही मातीला मिळवून मराठ्यांच्या महाराणीला गाय करीन आणि अपुरी प्रतिज्ञा शेवटास नेईन!-' असें ती दौलतरावाला आश्वासन देते, तेव्हां त्याचें प्राणोत्क्रमण होतें. दौलतरावाच्या रक्तानें रंगलेला एक दगड त्याच्या क्रियाकर्मासाठीं जीवखडा म्हणून तुळशी आपल्या पदरीं बांधून घेते.

## नजराण्याचा प्रवेश

( अंक २, प्रवेश ३ )

मराठेशाहीवर सूड उगविण्याची घोर प्रतिज्ञा करून तुळशी निघाली ती फिरंग्यांना जाऊन मिळाली. त्यांच्या मदतीनें सूडाचें कारस्थान रचण्याचा तिचा घाट होता. पुढें संभाजीराजांनीं गोव्यावर स्वारी केली. त्यांत फिरंग्यांचा पराभव झाला. प्रस्तुत प्रवेशांत फिरंग्यांचे वकील हिरे, माणकें, पाचू वगैरे तबकांत भरून संभाजीराजांना नजराणा करण्यासाठीं आलेले आहेत. तीं हिरेमाणकें पाहून राजे म्हणतात कीं, 'रायगडचा राजा हातांत खडे धरील तर त्यांचीं हिरेमाणकें होतील. असला नजराणा आम्हांस नको आहे. आपणांकडे कांहीं चैनीच्या, अत्यंत चित्ताकर्षक वस्तु असतील तर त्या पाठवा!' संभाजीवर मोहनी टाकून त्यास पुन्हा आपल्या कह्यांत आणावयास ही चांगली संधि आहे असें पाहून फिरंग्यांकडून स्वतःलाच नजराण्यादाखल

पाठवून घेण्याची तुळशी योजना करिते व फिरंगी पोशाख करून, सर्वांगावर बुरखा पांघरून आणि हातांत उंची मद्यानें भरलेला प्याला घेऊन ती संभाजीराजांसमोर येते. त्या प्याल्यावर तवंगणारी शराबी चमक पाहून राजांना तुळशीच्या नजरेंतील गहिऱ्या ल्काकीची आठवण होते व तिच्या सहवाससुखाची जुनी आठवण मनांत जागी होऊन, तिनें दिलेल्या पहिल्या रुकाराचा मनोहर प्रसंग त्यांच्या डोळ्यासमोर उभा राहतो, आणि अधीर उत्सुकतेनें ते 'एकच प्यारा बोल। मनीं या खोल। जाउनी बसला ॥' हें गाणें स्वतःशीं गुणगुणूं लागतात. आपणांस प्रकट व्हावयाला ही संधि उत्तम आहे असें जाणून तुळशी तोंडावरचा बुरखा दूर करते. इतक्या अद्‌भुत व नितांत शृंगारिक रीतीनें तुळशी प्रकट झालेली पाहून राजे विकारवश होतात व पुन्हा त्यांच्यावर तिच्या सौंदर्याचा अंमल बसतो.

## दूधसागराचा प्रवेश

(अंक ४, प्रवेश ३)

[ सदर्न मराठा रेल्वेवरील कॅसल रॉक स्टेशनानंतर दूधसागराच्या धबधब्याचा अत्यंत नयनमनोहारी देखावा दिसतो. अशा विलक्षण रमणीय स्थळीं प्रस्तुत प्रवेशाची योजना केलेली होती. ] गोव्याच्या स्वारीहून परत येतांना, संभाजीराजे तुळशीसह दूधसागराचा धबधबा पाहावयास गेलेले आहेत. दोघेजण कड्याच्या अगदीं टोंकावर उभे राहून, सहस्रधारांनीं उड्या टाकीत, खालीं खोल दरींत जाणाऱ्या दुग्धमय जलप्रवाहाची मौज पाहात आहेत. त्या वेळीं तुळशीच्या मनांत कांहींतरी विलक्षण विचार उत्पन्न होऊन त्यामुळें कंपित झालेल्या तिच्या हाताचा राजाना किंचित् धक्का बसतो. तेव्हां, 'मला तूं खालीं ढकलून तर देत नाहींस?' असें राजे विनोदानें विचारतात. त्यावर 'आपणांला मीं येथून ढकललें तर काय कराल?' असा तुळशी त्यांना सवाल करिते. तेव्हा राजे म्हणतात कीं, 'माझ्या डोळ्यांत इतकी अपूर्व जादू भरलेली आहे, कीं कोणत्याहि माणसाला मला खालीं ढकलून देण्याचें धैर्यच होणार नाहीं! पाहा, तुझी हिंमत असेल तर दे मला ढकलून!' राजांचा हा धाडसी बेफिकीरपणा पाहून तुळशी विस्मयचकित होते व तिच्या मनांत आलेले विचार त्या वेळेपुरते दबतात.

( कै. राम गणेश गडकरी यांच्या हस्तलिखित टांचणांवरून )

# Plot Building & Economy of

# राजसंन्यास

राजसंन्यास is a Principle-play: the Principle to underlie the plot is that of राजसंन्यास which exactly would mean.— सार्वजनिक मनुष्य आणि खासगी मनुष्य याच्या लढ्यात जसजशी जबाबदारी मोठी असेल तसतशी इच्छा मरत जाऊन, कर्तव्यमय रुक्ष आयुष्य – निरिच्छ आयुष्य – निष्काम क्रिया विजयिनी व्हावयास पाहिजे. सर्वात्मक परमेश्वर निर्विकार आहे; राजा हें परमेश्वराचें जड दृष्टीला दिसणारें स्थूल व व्यापकतम स्वरूप आहे; म्हणून राजा हा जगाचा इच्छाविरहित उपभोगशून्य स्वामी आहे.

This theory to be clearly explained to संभाजी by साबाजी in the fourth scene of the first act; and to be actually practised by येसूबाई in the next scene.

## Main Characters

| No. I<br>Wrong-side | | No. II<br>Right-side |
|---|---|---|
| संभाजी, रायाजी, तुळशी, दौलतराव, शिवाजी, कलुषा } दुःखी | सार्वजनिक जबाबदारी कळणें व न कळणें हें नाटकाचें मुख्य सूत्र. आणि मुख्यतम व्यक्तीच्या कर्तव्यपरायणतेवांचून बाकीच्यांची-परिस्थितजनाची पुण्याई रद्द होते, ही या सूत्राची व्यवहारिता. या नाटकांत सर्वांनीं नुकसानींत येणें अवश्य आहे; कारण, मूळ बिंदु संभाजी शुद्ध नाही म्हणून चांगली बाजू चूक नसतांनाहि दुःख भोगिते, व चुकलेली बाजू आपल्या बेजबाबदारीमुळें नुकसानींत येते. बेजबाबदार जीवांशीं पुण्यजीवांचा संबंध आला म्हणजे त्यांची पुण्याई निष्फळ होते. | येसूबाई, शिवांगी, साबाजी, हिरोजी, पिरजीस } दुःखी |
| No. III<br>देहू | | No. III<br>चांदणी |

# राजसंन्यास नाटकाचें प्रकृति-विवेचन

## प्रकृतींतील भेद-सादृश्यें

| Group | पात्रें | सादृश्य | भेद |
|---|---|---|---|
| १ | १ संभाजी<br>२ येसूबाई | Natural high taste & magnanimity | १ इच्छेचा अनावरपणा. इच्छा.<br>२ आवरलेली इच्छा. कर्तव्य. |
| १ | १ संभाजी<br>२ तुळशी | इच्छेची प्रबळता व सौंदर्याची जाणीव | १ स्वभावजात अढळ उच्चवृत्ति.<br>२ विकाराचे भरांत नष्ट उच्चवृत्ति. |
| ३ | १ संभाजी<br>२ रायाजी | इच्छेची प्रबळता व प्रेमाची कल्पना | १ इच्छा पापमय सुद्धां.<br>२ इच्छेची पवित्रता आवश्यक. |
| ४ | १ संभाजी<br>२ साबाजी | शक्तीचे सद्गुण | १ विकाराचे भरांत सद्गुणांशीं विरोध.<br>२ सद्गुणाविषयीं विवेकपर आदर. |
| ४ | १ संभाजी<br>२ हिरोजी | उतावळेपणा व शक्ति. | १ शक्तीचा व घाईचा दुरुपयोग.<br>२ शक्तीचा व घाईचा सदुपयोग. |
| ३ | १ संभाजी<br>२ दौलतराव | गुणांतील साधर्म्यामुळें हीं पात्रें एकत्र येत नसून परिस्थितीमुळें व बाळपणींच्या सहवासामुळें एकत्र येतात | १ अनाठायीं साहसप्रियता.<br>२ योग्य प्रसंगीं सुद्धा साहसशून्यता. |

| Group | पात्रें | सादृश्य | भेद |
|---|---|---|---|
| ४ | १ संभाजी<br>२ जिवाजी | कर्तबगारी व असहिष्णुता; कर्तबगारीचा दुरुपयोग व परस्त्रीशीं भानगड | १ उच्चवृत्ति.<br>२ नीचवृत्ति. |
| ४ | १ संभाजी<br>२ देहू | (१) शिवाजीहून<br>(२) शिवाजीइतकें } थोर होण्याची इच्छा | १ अधिक समर्थ पात्रता पण दुरुपयुक्त.<br>२ पात्रता मुळींच नाहीं. |
| ४ | १ संभाजी<br>२ कलुषा | वाटेल त्या मार्गानें सुखलालसा तृप्त करणें | १ तुळशीबद्दलच्या उच्च अभिरुचीनें.<br>२ चांदणीबद्दलच्या नीच अभिरुचीनें. |
| २ | १ येसूबाई<br>२ तुळशी | स्वाभिमान | १ निरिच्छता.<br>२ लोभबुद्धि. |
| २ | १ येसूबाई<br>२ शिवांगी | स्वतांचा स्त्रीधर्म व पतिनिष्ठा | १ उग्र कर्तव्यमय प्रेम.<br>२ स्वतांचा विसर पाडण्याइतकी प्रेममयता. |
| २ | १ येसूबाई<br>२ चांदणी | थोर पदाचा अभिलाष | 1 High taste.<br>2 Low taste. |
| २ | १ तुळशी<br>२ शिवांगी | इच्छेची प्रबळता | १ इच्छेची पापमयता.<br>२ इच्छेची पवित्रता. |
| २ | १ तुळशी<br>२ चांदणी | लोभबुद्धि व विलासप्रियता | १ उंच वातावरण ( sphere )<br>२ नीच वातावरण ( ,, ) |

| Group | पात्रें | साद्दश्य | भेद |
|---|---|---|---|
| १ | १ तुळशी<br>२ दौलतराव | हीं पात्रें गुणानें जोडलेली नसून दैवानें जोडून आणलेली आहेत. त्यांत सूडाची तीव्रता एवढेंच साम्य | १ साहसप्रिय व Romantic स्वार्थबुद्धि.<br>२ व्यवहारवृत्तीची साहसशून्य स्वार्थबुद्धि. |
| २ | १ दौलतराव<br>२ रायाजी | मराठेशाहींत सारखी पदवी.<br>(१) दर्यासागर (२) सेनासागर. | १ पदवीला नालायकपणा.<br>२ पदवीला लायकपणा पण गूढनिद्रित. |
| | १ जिवाजी<br>२ देहू | परिस्थितीनें जवळ आणलेली पात्रें. जिवाजीची साधनापेक्षां व देहूची साधन होण्यासारखी स्थिति यामुळें जवळ आल्यावर तसें राहणें | १ पाजीपणा.<br>२ सरळपणा. |
| | १ जिवाजी<br>२ कलुषा | स्वार्थपरायणता | १ बुद्धिमत्ता.<br>२ बुद्धिशून्यता. |
| | १ साबाजी<br>२ हिरोजी | सर्व सद्गुण | १ धिमेपणा.<br>२ घाई, किंचित् अधीर. |
| | १ जिवाजी<br>२ चिटणीस | ( लिहिलें नाहीं ) | ( लिहिलें नाहीं ) |
| | १ चिटणीस<br>२ कलुषा | ,, | ,, |

[ अपूर्ण ]

Group No. 1 :—बेजबाबदार : परिणाम : व्यक्तिशः दुःखीपश्चात्ताप तळमळ. ( भेद ) इच्छेविरुद्ध दुःख भोगणें. सार्वजनिक हितहानि ( सादृश्य ).

Group No. 2: —जबाबदार, पण बेजबाबदारावर जीवित अवलंबून : म्हणून दुःखी; दुःख व्यक्तिशः समाधानी; ( भेद ) सार्वजनिक हितहानि ( सादृश्य ).

Group No. 3 :—इच्छा : पवित्र : कर्तव्य : चूक : म्हणून सुखी. सुखाची degree खालच्या दर्ज्याची.

[ अपूर्ण ]

# राजसंन्यास नाटकाचें ‘ कसें व कां ? ’

| | |
|---|---|
| Why should संभाजी suffer ? | राजधर्म सोडला म्हणून. |
| ” ” येसूबाई ” ? | संभाजीशीं नशिबानें बांधली म्हणून. |
| ” ” तुळशी ” ? | [१] संभाजीवर मोहित होण्यांत पत्नीधर्म सोडला म्हणून. [२] भलत्या प्रकारची सुखाची कल्पना करण्यांत व भलत्या वेळीं समुद्रांत होडी टाकण्यांत स्त्रीधर्म सोडला म्हणून. |
| Why should दौलतराव suffer ? | तुळशीसाठीं समुद्रांत उडी न टाकण्यांत पतिधर्म सोडला म्हणून. |
| ” ” रायाजी ” ? | प्रेमाच्या नादांत सेनापतिधर्म सोडून बेजबाबदार झाल्यामुळें. |
| ” ” शिवांगी ” ? | रायाजीशीं नशिबानें बाधली म्हणून. |
| ” ” साबाजी ” ? | संभाजीशीं नशिबानें बांधला म्हणून. |
| ” ” हिरोजी ” ? | संभाजीशीं नशिबानें बांधला म्हणून. |
| ” ” जिवाजी ” ? | [१] वयाची जबाबदारी सोडून विश्वस्त देहूची चांदणी मिळविण्याची इच्छा केल्यामुळें [२] कलमाची जबाबदारी विसरला म्हणून. |
| Why should कलुषा suffer ? | सेवाधर्माची एकनिष्ठतास्वरूप जबाबदारी विसरला म्हणून. |

शिवाय, सर्वांच्या दुःखमय परिस्थितीच्या मुळाशीं संभाजीनें राजधर्म विसरणें हें आहेच. This is practical exposition of the principle. १ शाहू, २ चिटणीस, ३ देहू व ४ चांदणी हीं पात्रें फारशीं नुकसानींत येत नाहींत; कारण [ १ व २ ] यांचें जबाबदारी घेण्याचें वय नाहीं किंवा [ ३ व ४ ] यांच्या जबाबदारीचें क्षेत्र व्यापक नाहीं म्हणून ह्या दोन कारणांमुळें जबाबदारीचा परिणाम निर्जीव—हिशेबांत न घेण्यासारखा—होतो. मंजुळा, औरंगजेब, अहंमद, मोरे व माने हीं साधनीभूत अतएव फिक्या रंगाचीं पात्रें; तींफार सूक्ष्मपणानें रंगवावयाला नको; कामापुरतीं आणणें. [ अपूर्ण ]

## Some Guiding Notes

( १ ) साबाजीच्या शांतपणामुळें दौलतराव- व संभाजी बेतांत राहतात. हिरोजीच्या घाईमुळें तुळशी, संभाजी खवळतात. Final निर्णयाला सुद्धां हिरोजीची घाई अप्रत्यक्षरीत्या कारणीभूत होते.

( २ ) ज्या शिवांगीमुळें रायाजी बेजबाबदार होतो तीच त्याला सोडावी लागते.

( ३ ) ज्या तुळशीमुळें संभाजी बेजबाबदार होतो तीच त्याच्या नाशाला कारणीभूत होते.

( ४ ) ज्या लेखणीच्या दुरुपयोगानें जिवाजी चढतो तिनेंच तो मरतो.

( ५ ) ज्या चांदणीमुळें जिवाजी चळतो तिनेंच तो मरतो.

( ६ ) ज्या अज्ञानामुळें माने शिवांगीला मारतो त्याच अज्ञानामुळें तो जिवाजीला मारतो.

[ अपूर्ण ]

[ खालील पद नाटकांत कोणत्या अंकांत, कोणत्या स्थळीं घालावयाचें होतें, तें समजण्यास मार्ग नसल्यामुळें तें येथें दिलें आहे. ]

**शिवांगीः—**

[ रायाजीसाठीं शोधीत फिरत असते वेळीं पहिलें पद ]

**चालः**—( वख्ते तुलख देखा )

भासे जनांत राया । हांसे मनांत राया ॥
नवखंड देह नटला । दिलदार एक राया ॥ ध्रु० ॥
मार्गे सदा फिराया । भागे अनंत काया ॥
लागे जिवास माया । लाभे परी न राया ॥
हातीं अखड भरला । इष्के शराब प्याला ॥
नाहीं अजून प्याला । दिलदार प्यार राया ॥ १ ॥

श्री

# अर्पण-पत्रिका

इतिहास छातीला हात लावून पुढील कथा सांगतो आहे, तेव्हां विश्वासानें ती मुकाट ऐकून घ्यायला हवीच. थोरल्या छत्रपतींचा एक आवडता कुत्रा होता. हें "समर्थांघरींचें श्वान" खरोखरीच सर्वांनीं मान देण्यासारखें होतें. हा इमानी जीव आबासाहेबांना कधींहि विसंबत नसे. अखेर, प्रभूंचें शुभावसान झाल्याबरोबर, त्या मुक्या इमानानेंहि त्यांना स्वर्गापर्यंत सोबत केली. आज रायगडावर, त्याची भाग्यशाली समाध राजांच्या समाधीशेजारीं मांडीला मांडी लावून बसलेली, तिन्ही लोक डोळ्यांनीं पाहत आहेत. त्या समाधीवर, त्या चतुष्पाद पशूची पूजा बांधण्यासाठीं, नरदेहाचा नसता अभिमान सोडून, माझ्या या "राजसंन्यासा"च्या पामर बोलांची-डोंगरपठारीवरच्या या रासवट रानफुलांची पांखरण करून ठेवीत आहें.

राम गणेश गडकरी

# अंक पहिला

## प्रवेश पहिला

### पांच देवींचा पाळणा

गुणि बाळ असा जागसि कां रे वायां ।
        नीज रे नीज शिवराया ॥ ध्रु० ॥

अपरात्रीचा प्रहर लोटला बाई ।
        तरि डोळा लागत नाहीं ॥
हा चालतसे चाळा एकच असला ।
        तिळ उसंत नाहिं जिवाला ॥
निजवायाचा हरला सर्व उपाय ।
        जागाच तरी शिवराय ।
                चालेल जागता चटका ।
                हा असाच घटका घटका ।
                कुरवाळा किंवा हटका ।
कां कष्टविशी तुझी सांवळी काया ।
        नीज रे नीज शिवराया ॥ १ ॥

ही शांत निजे बारा मावळ थेट ।
        शिवनेरी जुन्नरपेठ ॥

त्या निजल्या ना तशाच घाटाखालीं ।
कोंकणच्या चवदा ताली ॥
ये भिववाया बागुल तो बघ बाळा ।
किति बाई काळा काळा ॥
इकडे तो सिद्धि—जमान ।
तो तिकडे अफजुलखान ।
पलिकडे मुलुखमैदान ।
हे आले रे तुजला बाळ धराया ।
नीज रे नीज शिवराया ॥ २ ॥

[ स्थळ : मालवणचा पाणकोट सिंधुदुर्ग. काळ : संध्याकाळ. पात्रें : गडाच्या बुरुजावर श्रीसंभाजीमहाराज, सिंधुदुर्गचा किल्लेदार दौलतराव शिरके ( दर्यासागर ), सिंधुदुर्गचे गडकरी, रायाजी मालुसरे ( सेनासागर ) वगैरे. खालीं घाटावर तुळशी, मंजुळा, घाटाजवळ होडी. तिच्यांत उतरण्यासाठीं तुळशी एक पाय टाकीत आहे; मंजुळा तिचा हात धरीत आह. शेजारीं संभाजीमहाराजांचें जहाज तयार आहे. ]

**मंजुळा :** बाईसाहेब, माझ्या गळ्याची शपथ आहे. समुद्र इतका खवळलेला आणि अशांत तुम्ही होडी टाकणार ?

**तुळशी :** मंजुळे, सोड माझा हात ! ही तुळशी मिळमिळीत मनाची नाहीं.

**मंजुळा :** बाईसाहेब, नांवाजलेल्या नाखव्याची अक्कलसुद्धां अशा वेळीं पाण्यांत पडून जिवाचें पाणी व्हायचें; अशांत उगीच जिवावर पाणी सोडायचें ?

**तुळशी :** बेफाम दरिया पुळणी ओलांडून भेटायला आला, ओरडत्या लाटांनीं आळवूं लागला, तुफानी फेसानें हंसायला लागला आणि अशा वेळीं घरगौरीची पूजा बांधून बसायचें ?

**मंजुळा :** बाईसाहेब, दर्यासागर अशानें रागास येणार नाहींत का ? मी आपली सांगेन, माझा हात झिडकारून बाईसाहेब पुढें झाल्या.

**तुळशी :** दर्यासागर दौलतराव रागास येतील ! लग्नाची माळ मला अशी जखडणार नाहीं ! बाशिंग इतकें डोईजड मी. होऊं देणार नाहीं ! तुझा हात

झिडकारून — दौलतरावाचा हात तोच तुझा हात! अग, लाखांत एखादा हात खरा असतो. जगाच्या बाजारपेठेंत माणसांचीं बाहुलींच फार विकायला येतात. त्या बाहुल्यांतल्या बायका–पुरुषांचे हात सारखेच ! बांगड्यांनीं बायकी हाताला खूण बांधून होत नाही !

**मंजुळा :** बाईसाहेब, असें कसें बोलावें ! जनरीति बघायला नको का ? घरांत सुख थोडें का आहे ?

**तुळशी :** सुखाला बाहेरचा वारा सोसत नाहीं वाटतें ? घराच्या कोंडवाड्यांत जीव श्रमी करून घ्यायचा हेंच बायकांचें सुख वाटतें ? इथें बसूं नकोस, असें हसूं नकोस, तिथें जाऊं नकोस, तसें गाऊं नकोस, इकडे पाहूं नकोस, तिकडे राहूं नकोस ! इतक्या आडवाटेनें सुखाचा पल्ला गांठायचा ! मी अशी सांगितल्या बुद्धीची नाहीं. पांख मोडल्यावर मैना कसली ! गळा दाबल्यावर कोयळ कसली ! दांत पाडल्यावर नागीण नाहीं ! डोळे फोडल्यावर वाघीण नाहीं ! जा; सोड माझा हात. [ होडी चालू करते. ]

**संभाजी :** दर्यासागर दौलतराव ! तुमच्या छत्रपतीला भीति घालतांना तुम्हांला भीति वाटत नाहीं ? समुद्र जरासा खेळायला लागला म्हणून तुम्हांला धास्ती वाटते ?

**दौलतराव :** राजे, हा समुद्राचा खेळ नाहीं, पण कळिकाळाचा खेळ आहे ! मोडत्या लाटेचा जबडा उघडून दर पळास बुरजाचा घांस घेण्यासाठीं — जमिनीला गिळण्यासाठीं समुद्र बेगुमान बळानें धडपडतांना दिसत आहे. चौदा रत्नांची चोरी हुडकण्यासाठीं उभ्याआडव्या अंगानें आकाशपाताळ धुंडाळीत आहे. अशा वेळीं प्रत्यक्ष छत्रपतींना — रायगडच्या कोंदणांतल्या या रत्नाला — उघड्यावर टाकून चालायचें नाहीं. अशा प्रळयांत समुद्रांत गलबत टाकणें हिशेबी नाहीं.

**संभाजी :** मग अंगणांत फिरविण्यासाठीं गलबतें केली आहेत वाटतें ? दर्यासागर दौलतराव, अशा बेहिमतीनें रायगडच्या रियासतीची आरमारी अब्रू तुम्ही कशी संभाळणार ? ही जलवंती म्हणजे सिंधुदुर्गाच्या जनानखान्यांत अडविलेली रायगडची राणी आहे ! जलवंतीच्या जोबनाचा लाटेचा पदर वारा वाहील तसा उधळूं लागला, तर आपल्या जिवाच्या जरबेनें तिच्या जनानी जोराला दडपून टाकिलें पाहिजे !

**दौलतराव :** सरकार, कारणावांचून धोक्यांत उडी टाकणें बऱ्या बुद्धीचें लक्षण नाहीं. गडावर आज गेलें काय आणि उद्यां गेलें काय, सारखेंच! ही कांहीं घटका मोजण्याची वेळा नव्हे. तुफान दरिया डोळ्यांसमोर नाचूं लागला म्हणजे नजरेचा भोंवरा गरगरायला लागून जिवाला घेरी येते; जीव जाण्यापूर्वी मरण येण्याचा हा प्रसंग! बिनासबब जिवाची खैरात करण्यांत काय हंशील?

**संभाजी :** कारण पडेल तेव्हां नामर्दाचासुद्धां मर्द होतो; पण जातिवंताचा जीव हरघडी जातीला हुडकीत असतो. देवाची दांडगी दुनिया अशा रीतीनें आभाळांत तेजाच्या चमकीनें नाचूं लागली, गडगडून बादली बडबड करूं लागली म्हणजे कच्च्या जिवाच्या जनावरांच्या माना मोडतात, जिभा जखडतात, जीव जडावतात; पण त्या वेळीं जंगलशाहीच्या बादशहाची सिंहगर्जना सुरू होऊन वरच्या अस्मानी सवालाला जमिनीचा जबाब मिळतो! धरणीमातेचें हृदय या तुफान दरियाच्या अवतारानें उचंबळून आलें म्हणजे तिच्या अस्सल बाळाचा — मैदानमाप छातीच्या मर्दाचा — दिलाचा दरिया बेकदर नाचायला लागतो! तुम्हांला नुसत्या ऐकिवानें जाणवायचें नाहीं! राया, तूं सिंहगडच्या सुभेदारांचा — तानाजी मालुसऱ्यांचा — बच्चा आहेस, मराठ्यांचा सेनासागर आहेस. तुला वाटतें ना माझ्यासारखेंच? बेडर जीवानें तूं टाकशील का उडी या भेसूर मौजेंत?

**रायाजी :** बेशक! पण केवळ माझ्या शिवांगीसाठीं! माझी हरवलेली शिवांगी या दरियानें गिळिली आहे अशी कुणीं माझी खातरजमा करून दिली, तर या खवळलेल्या दरियाचा एका ओंजळीनें उपसा करीन; अलम देशदुनिया नजरेच्या टापूंत आणून देण्याइतकी एखादी लाट उभी चढली तर माझ्या शिवांगीला न्याहाळण्यासाठीं त्या ताडमाड लाटेच्या कळसाला जाईन! शिवांगी! शुभांगी! शिवगंगा! तिच्यासाठीं वाटेल तें करीन! तिच्यावांचून मात्र मन रमत नाहीं, जीव जमत नाहीं!

**संभाजी :** राया, इष्काचा शिपाई तुझ्यासारखा बेदर्दच असतो. जिवाशीं जडविलेल्या जिवासाठीं अंतकाळाला लाभकाळ समजावें लागतें!

[पडद्यांत : मंजुळा : धावा हो धावा! होडी उलटली! धावा हो धावा! बाईसाहेब दिसेनाशा झाल्या.]

कोणाची आरोळी ही?

**किल्लेदार :** ही मंजुळेची आरोळी. बाईसाहेबांची होडी उलटली वाटतें !

**संभाजी :** बाईसाहेब म्हणजे दर्यासागरची तुळशीच ना ? दौलती, अजागळासारखा आ करून कां उभा राहिला आहेस ? तुला प्रसंग पाहिजे होता ना ?

**दौलत० :** बेताल जिवाची धडपड म्हणजे प्रसंग नाहीं. तिला आज राखली तर ती उद्यां मरेल. अष्टौप्रहर काळाच्या कडेवर खेळणाऱ्या या बेमुरवत बायकोसाठीं जिवाचें मोल ठरविण्याइतका मी मूर्ख नाहीं. वाऱ्याच्या लहरींनीं दरिया नाचायला लागला, मनाच्या लहरीनें या वेळीं तुळशी नाचायला लागली ! असें वेताल नाचतांना एखादें पाऊल मृत्युलोकाच्या हद्दीबाहेर पडायचेंच !

**रायाजी :** ( स्वगत ) नशिबाचा शिकंदर पण करणीचा कमकुवत ! इष्काच्या शिपायाला अशी मोलाची मोहीम लाभायला या दौलतीसारखें संगीन भाग्य असावें लागतें. माझ्या शिवांगीची बुडती आरोळी अशी माझ्या कानावर येईल तर शेषाच्या लांबणीनें हा हात काळाच्या असा तोंडांत घालून त्याच्या आंतड्यांसकट शुभांगीला बाहेर काढिली असती !

**संभाजी :** दौलतराव, साबाजी शिरक्याच्या पोटीं तुझा जन्म झाला — वेअब्रूला बेहेत्तर करील, पण या वेळीं तुला असा पाहिला तर साबाजी आपली अवलाद नाकबूल करील ! तुळशीचा तूं नवरा आहेस. हिरोजी फरजंदानें आपल्या गोठ्यांतील गाय तुझ्या राखणीला घातली असें का तुला वाटतें ? साबाजी मेल्यावर त्याची तलवार त्याच्या शवाच्या कमरेलाच बांधली पाहिजे. तुझ्यासारख्या मेल्या माणसापेक्षां त्या जित्या मुड्याची सोबत तिला मानाची वाटेल.

[ पडद्यांत–मंजुळा : धावा हो धावा ! ]

नवऱ्याचें नांव सांगणाऱ्या नामर्दा, देवाखातर तरी उडी टाक.

**दौलत० :** राजे, माझ्या मनाची मुखत्यारी तुमच्याकडे नाहीं !

**संभाजी :** नवऱ्यानें बायको बुडविली तरी राजानें प्रजा तारली पाहिजे. राया, तुळशीच्या बांगड्यांची बेडी करून या नामर्दाला कैद कर. ती तोडण्याची याच्या अंगांत ताकद नाहीं. दौलतराव, हिंमतमर्दा तो मदत खुदा. तुळशीच्या मर्दानी हिंमतीला हात देण्यासाठीं, हा पाहा, रायगडचा परमेश्वर समुद्रांत उडी टाकतो आहे !

[ उडी टाकतो. ]

**रायाजी :** दौलतराव, मराठीशाहीच्या दर्यासागराचीं नालायकी दाखवून तूं मोकळा झालास. किल्लेदार, गलबत घेऊन राजांच्या मागोमाग चला.

**किल्लेदार :** सेनासागर, दौलतरावांनीं राजांना सांगितलें तेंच मी पुन्हा तुम्हांला—

**रायाजी :** या सिंधुदुर्गावरचीं सारींच माणसें मृतमुखी दिसतात. किल्लेदार, गलबत टाक म्हटलें म्हणजे टाक! सागर खवळला तरी मर्यादेंत राहील; पण हा सेनासागर खवळला तर सीमा सुटतील!

**दौलत० :** जाऊं देत किल्लेदार, नाखव्याला म्हणावें नांगर सोड–( एकीकडे ) खुशाल यांच्या घरादारावरून फिरूं देत.

[ तुळशीला हातावर घेतलेली असा संभाजी दृष्टीस पडतो. ]

**संभाजी :** तुळशी, घाबरूं नकोस; डोळे उघडून नीट पाहा.

**तुळशी :** कोणीं मला हात दिला? तुळशीचें यश कुणीं हिरावून नेलें?

**संभाजी :** रायगडच्या रणमर्दानें! ( तुळशी डोळे उघडून पाहते. ) तुळशी, अजून भेदरल्यासारखी कां दिसतेस?

**तुळशी :** तुळशी कधीं भ्याली नाहीं! त्रिखंड धुंडाळून मला भीति सांपडली नाहीं, म्हणून तिला पाहण्यासाठीं आज या दरियाच्या तळाचा ठाव मी पाहात होतें.

**संभाजी :** तुळशी, जिभेचा भरंवसा कुणीं धरावा? माणसाला जीभ खोटें बोलण्यासाठीं मिळाली आहे; जिवाची खरी भाषा अवघ्या अंगांनीं बडबडते. तूं भ्याली नाहींस, मग हें काय आहे? नुसत्या फेंसाचा मारा चुकविण्यासाठीं भित्री नजर पापणीच्या पडद्याआड होते आहे; उसळत्या पाण्यानें गालां-ओटांवरली गुलाबी शोभा धुऊन गेली आहे. छातीच्या धरणीकंपानें जोबन-शाहीच्या किल्लेकोटांना चळ भरल्यामुळें भ्यालेल्या जिवानें साऱ्या देहावर ही कांटेरी शिबंदी उभारली आहे. ही भीति नाहीं का?

**तुळशी :** नाहीं; एकदा नाहीं; लाखदा नाहीं. चतुरा, आपण चुकलां. या चपळ पाणभुईवर आपली नजर न ठरल्यामुळे आपल्या डोळ्यांना प्रीतीचें पहिलें रूप भीतीसारखें दिसलें. इतकें का हें पाणी चंचळ आहे? मला अजून भीतीप्रमाणेंच प्रीतीचीसुद्धां — वीरा, नेटकी नजर रोखून असें निरखून पाहूं नका. माझ्या पहिल्या बोलण्याची — मर्दुमकीची शेखी केल्याची रायगडच्या

रणमर्दा, नारीजातीला क्षमा करा. ही तुळशी आज भ्याली आहे.

[ मान खालीं घालते. ]

**संभाजी** : साजणी, आपण काय बोलतां हें! पाणी चंचल आहे, पण मन पाण्याहून चंचळ आहे. माझ्या मनाची उडी आपल्या बोलांच्या पलीकडे जाते आहे का? साजणी, तुमच्या जिवाखातर समुद्राचा ठाव काढण्यासाठीं मी झटलों; पण तुमच्या मनाचा ठाव—

**तुळशी** : देवा, आतां तेही कष्ट घेऊं नका आणि हेही कष्ट घेऊं नका. मानसींच्या राजहंसा, माझ्या मनीं उडी घेऊं नका. जें कधीं काळीं घडायचें नाहीं त्यासाठीं रडायचें कशाला? आजवर कोणत्याही पुरुषाच्या डोळ्याला डोळा भिडवितांना तुळशीची नजर चळली नाहीं, पापणी ढळली नाहीं. नवख्या नजरेच्या नेम चुकविण्यासाठीं कधीं पदर सांवरला नाहीं, कधी जीव बावरला नाहीं. आज तुळशीचा अभिमान उतरला. रायगडच्या राजाला पाहण्यासाठीं डोळ्यांत जिवाची प्रभा दाटली, ताजिमीसाठीं देहावर कांटेरीसभा थाटली, नजरेच्या एकाच फिरतीनें डोळ्यांत रूपरेखेची सांठवण झाली, तुळशीला पदराची आठवण झाली. पुन्हां आपल्याकडे पाहतांना नजरेची ज्योत पापणीनें मालवली — उरींची लाज पदरानें पालवली. आज जवानमर्दीच्या बादशहानें माझ्या जोबनवंतीला कांटेरी भूषणें बहाल केली. आपल्या देहाच्या स्पर्शानें माझा देह नटला, पण जीव हटला. महाराज! तुळशीच्या हटलेल्या जीवासाठीं या दांडग्या दरियाशीं झगडून देह कष्टवूं नका. आतां जीव नकोसा वाटतो.

**संभाजी** : रायगडच्या रणमर्दाला यांत कष्ट होणार? साजणी, उच्बंळती लाट डोक्यावरून निघून गेल्यावर, घाबरल्या हातांनीं तोंडावरचे केस मागे सारतांना चुकार केसांचा एखादा गोफ तसाच गालावर खेळत आहे! लाटेच्या माराला भिऊन झिरझिरीत पदर आपल्या उराशीं लपत आहे! उघडल्या पापणीवरच्या तुषारांमुळें डोळ्यांची धांदलीनें उघडझांक होते आहे; आपल्या मस्तकीं बसल्यानंतर पुन्हा पाताळपाणी पाहावें लागणार म्हणून एकेक पाण्याचा थेंब आपल्या केशपाशावरून सावकाश दिलगिरीनें सुटत आहे! गर्दीनें उघडल्या झांकल्या डोळ्यांवरून पळणाऱ्या एखाद्या थेंबांतून मावळता सूर्यनारायण आपल्या तिरप्या तीरांनीं सोनेरी नेम साधून तुमच्या डोळ्यांना दिपवीत

आहे! नजरबंदीनें क्षणभर घाबरल्यामुळें आपली माझ्या अंगाभोंवतींची मिठी किंचित् जोराची होऊन मला माझ्या बळाचं सार्थक वाटत आहे. अशा वेळीं कष्टाचा कोण केवा! सौंदर्याची नाजूक सेवा करितांना पराक्रमाला कौतुकांची कोंवळीक लाभते! सुंदर साजणी, या वेळीं माझ्या रंगलेल्या मनाला दिलगिरीचे बोल ऐकवूं नका. लाटांचे बोल आदळून देह कष्टत नाहीं; पण उदासवाणी बोल ऐकून माझ्या जिवाला मात्र कष्ट होतात. जगाचा — जिवाचा — असा कंटाळा करायचें काय कारण आहे?

**तुळशी** : जगाचा — जिवाचा कंटाळा? दुबळ्या संगतींत स्वर्गाचा, देवांचासुद्धां कंटाळा येईल. आतां रायगडच्या रणमर्दानें काया शृंगारल्यानंतर — आतां दौलतरावासाठीं जीव जगवायचा! जातीच्या जिवाशीं ओळख पटल्यावर कमजिवाशीं खेळायचें? रामाशीं मन रमल्यावर माकडाशीं मिठ्या मारायच्या! काळ्या मातीच्या मोलानें कस्तुरीची किंमत करणाऱ्या दौलतरावाचा भातुकलीचा संसार थाटण्यासाठीं रायगडच्या देवाला अशा कष्टांत पाडायचें! देवा, पुन्हा या मर्दुमकीच्या छातीवर मान विसांवून डोळे झांकून पडूं द्या; माझा जीव अशा सुखाच्या सागरांत बुडाला असतांना माझा देह या सागरांत बुडवून टाका! ज्या हातानें मला जीवदान दिलें, त्याच हातावर माझ्या देहाचें दान करण्यासाठीं मीं या उदंड दरियाचें पाणी सोडलें आहे. आतां मला वांचवूं नका. जोबनशाहीच्या बादशहा, आपल्या स्पर्शानें या देहावर चढविलेलीं ही सोळा शिणगारांचीं कांटेरी लेणीं आतां उतरूं नका. अशा थाटांत मला मरणाच्या दारीं पोंचवा. सह्याद्रीच्या राजसिंहा, सिंधुदुर्गाच्या वाघिणीची अशी गाय करून तिला चार भिताडांच्या कोंडवाड्यांत गुजरूं नका. दुबळ्या दौलतरावाच्या पलंगाच्या पाळण्यांतल्या प्रेमाच्या पोरखे—(एकदम लाजून) रणमर्द, दौलतरावाला नाहीं — उभ्या जगाला नाहीं — तुळशी तुम्हांला लाजली आहे.

**संभाजी** : आपली मर्जी आम्हांला हुकमतीनें वांकवील. साजणी, याच पावलीं रायगडावर चला. भगीरथ प्रयत्नानें लाभलेली ही शृंगाराची रसगंगा रायगडच्या शंभुदेवाला तिन्ही त्रिकाल शिरसावंद्य होईल. दुबळ्या दौलतरावाची तुळशी दरियांत बुडून मेली! रायगडच्या रणमर्दानें पाताळांतून एक नागकन्या बाहेर आणिली.

तुळशी : दिलदार, इतका आपला धीर होईल का ? लग्नाच्या बेडीनें आपले जीव निरनिराळ्या जिवांशीं जखडले आहेत.

संभाजी : दिलवर, गालावर सांडलेली ही गुलाबी शराब पाजून या जीवाला धुंद करा, म्हणजे मातीच्या मोलांनीं घडलेल्या लग्नाच्या दुबळ्या बेड्या तीं तुफान ताकदीनें तडातड तोडून टाकील ! अशा वेळीं मृत्युलोकींच्या पामर नियमांची काय पर्वा आहे ! एकाच क्षणाच्या आरंभीं, हेलकाव्यानें पातळापर्यंत खालावून आपल्या डोळ्यांचीं किरणें शेषाच्या फणींतल्या मण्यांच्या किरणांशीं खेळत आहेत, तर त्याच क्षणाच्या शेवटीं डोंगरलाटेसरशीं आम्ही आभाळाला भिडून आमचे डोळे चांदण्यांशीं गोष्टी सांगत आहेत. अशा रीतीनें क्षणमात्रांत आकाशपाताळ एक होतांना मृत्युलोकावर नजर कशी ठरणार ! प्यारी, मानव-लोकींचीं लग्नं रद्द करून, रायगडचा राजा आज तुझ्याशीं पुन्हा लग्न करीत आहे; मस्तकावरून सुटणाऱ्या या थेंबांची — सौंदर्याच्या या मोत्यांची — बिनसरांची मुंडावळ तुझ्या कपाळीं शोभते आहे ! समोर संध्याकाळचा होम पेटला आहे ! तुफान दरियांत मरणाचा नेम नसल्यामुळें काळाचा एकच पाश आपल्या दोघांच्या कंठांत आहे; त्याचीच लगीनमाळ करून डोंगरलाटेच्या बोहल्यावर, मावळत्या देवाच्या साक्षीनें, मरणाचा मुहूर्त साधून रायगडचा राजा मनाच्या मुक्या मंत्रानें, तुळशी, तुझ्याशीं लग्न लावीत आहे.

[ तिचें चुंबन घेऊं लागतो. पडदा पडतो. ]

## प्रवेश दुसरा

[ स्थळ : रायगड, जिवाजीचें घर. पात्र : जिवाजीपंत कलमदाने लेखणी करीत आहे. ]

जिवाजीपंत : [ लेखणीचा टाक तोडून—स्वगत ] वारुळांतली दोन जिभांची पिवळी नागीण चावली तर एकाच पिढीचा घात होतो; पण कारकुनी कानावरची ही दोन जिभांची काळी नागीण डसली तर सात पिढ्यांचा सत्यानाश करिते. काय

लेखणी झाली आहे पण! आम्हां कलमदान्यांच्या घराण्यामध्यें लेखणी करण्यांत हा जिवाजी म्हणजे केवळ शिवाजीसारखा शककर्ता पुरुष निपजलेला पाहून माझ्या वाडवडिलांना इतका आनंद झाला असेल कीं, अखेरवहीवर त्या आनंदाची जमा करितांना चित्रगुप्ताच्या कैक लेखण्या बोथट झाल्या असतील! वडिलांच्या पुण्याईनें आस्तेआस्ते मी असाच लौकिक वढवून ठेवणार आहे, कीं भवानीच्या जोरावर शिवाजीनें रायगडची दौलत मिळविली, पण या कलमेश्वरीच्या करामतीवर जिवाजीनें ती सारी आपल्या घरी पळविली! अशी लेखणी हातीं आल्यावर वाटेल त्याच्या हातचें वळण काढून दाखविणें म्हणजे या शाईभरल्या हातचा मळ आहे नुसता! गाईच्या एका देहांत तेहतीस कोटी देवांचे देह सामावतात; तद्वत् या जिवाजीच्या एकाच लेखणींत उभ्या दक्षिण देशाचा दस्तुरखुद्द एकवटलेला आहे! चिटणिशी वळण पाहिजे तर चिटणिशी वळण! राजांच्या हातचें कलम म्हटलें, कीं राजांच्या हातचें कलम! जसें कांहीं त्यांच्या हाताचें कलम करून माझ्या देहाला लाविलें आहे! या कलुशा कब्जीचें कनोजी कसब म्हणजे खरें म्हटलें तर परदेशी वळण; पण तेही वळणीवर आणलें अखेर! अक्षरांच्या तऱ्हा अगदीं हुकमी? गिचमिड अक्षरें काढलीं तर वडारणीचे केस उकलतां येतील, पण तीं अक्षरें उकलायचीं नाहींत! मोकळ्या लिपींत दोन दोन अक्षरांत एकेका गांवठाणाची ओसाडी सोडायची! एका अक्षरावरून दुसऱ्यावर नजर टाकण्यासाठीं वाचणाराला घोडदौडीनेंच मैदान कापावें लागायचें! बरें, आपल्या स्वतांच्या अक्षरांत एका लिखाणाचें दुसऱ्या लिखाणाशीं सगोत्र वाटायचें नाहीं. एकांत नवशिक्या पोरीनें केलेल्या तिळगुळाचे ओबडधोबड दाणे तर दुसऱ्यांत नुसते मोत्यांचे दाणे! एक अक्षर अगदीं आंधळ्यानें वाचावें, तर दुसरें डोळसाची आंधळ्यासारखी दिशाभूल करणारें! पण अक्षर बदललें तरी मजकुराच्या धोरणांत मात्र सरास कारकुनी कावेबाजी! लिपी बाळबोध असो कीं मोडी असो, मजकूर एकजात नागमोडी चालीचा! आतां इतके केल्यासारखें आमचा भावार्थ सिद्धीस जातो कीं नाहीं बघायचें. नाही तर ललाटींच्या रेषाही नागमोडीच असायच्या! नाहीं; पण, संभाजीराजांनीं या कलुशाला प्रधान केल्यापासून आमच्या सद्दीचा जोर असा बळावत चालला आहे, कीं



संभाजी : मावळत्या देवाच्या साक्षीनें, मरणाचा मुहूर्त साधून रायगडचा राजा मनाच्या मुक्या मंत्रानें, तुळशी, तुझ्याशीं लग्न लावीत आहे. (पृ. ९)

नशिबाच्या रेषा कपाळावर सांखळीनें आंखलेल्या गंधागत नीटस वठलेल्या आहेत असेंच वाटतें! ही असामी मात्र खरी नागमोडी मनाची आहे! अगदीं इरसाल असामी! इतका नीच माणूस इतक्या उंच जागीं बसलेला कधीं कुणीं पाहिला नसेल! कुठून कनोजी उंची अत्तरें विकायला आला काय आणि मराठेशाहीचा प्रधान झाला काय! त्याच्या अत्तराच्या पेटीचें नवखें नशीब थेट सिंहासनाच्या पायऱ्या चढत चाललें आणि आमची कलमेश्वरी मात्र तशीच कानावर अढळपद भोगीत राहिली! अत्तराच्या फायाबरोबर एखादा कानमंत्र फुंकून तर यानें राजांना भारून टाकिलें नसेल? कांहीं का असेना, तूर्त त्याच्या कानावरच आमच्या कलमानें कुरघोडी केल्यामुळें राजांचे कान-सुद्धां आमच्यापर्यंत लांबले आहेत, हें काय थोडें झालें? येसूबाईसाहेबांकडे जरा असेंच बस्तान बसलें तर चांदणीकडे नीट बघतां येईल! तिच्या जिवा-भावाचा मैत्र तो पहिलवान पोऱ्या आमच्या खाजगी खात्याकडे गुंतवून घेतला हें बेष झालें! हा देहू दप्तरी अगदीं पुरा आपलासा करून टाकला पाहिजे; म्हणजे चांदणी हातीं लागलीच म्हणायची! आलीच ही आडमाप स्वारी! (प्रगट) ये देहू, तुला अगदीं शंभर वर्षे आयुष्य आहे! (देहू दप्तरी पहिलवानी थाटात प्रवेश करतो.) बाकी, असें तालिमबाजीचें निकोप शरीर असल्यावर शंभर सोडून दोनशें वर्षे जगायला तरी काय मरण आहे?

[ देहू एकदम उडी मारून दोन बैठका काढतो व पवित्र्यांत उभा राहतो. ]

**देहू :** बजरंगबलीकी जय!

**जिवाजी :** अरे, असा आडव्यातिडव्या उड्या काय मारतोस?

**देहू :** या उड्या नाहींत! जिवबा, या उड्या नीट यायला दंगलींत दिवस घालवावे लागतात!

**जिवाजी :** दंगल म्हणजे? धिंगामस्ती?

**देहू :** अहो, दंगल म्हणजे आखाडा! आतां मीं उड्या मारिल्या नाहींत, दोन बैठका मारिल्या!

**जिवाजी :** या बैठका मारायला शिकण्यांत आजवर वेळ घालविलास म्हणून तर तुझ्या नशिबानें ही अशी बैठक मारिली आहे! तांबड्या मातींत लोळपटणीं घेऊन सारा जन्म मातीला मिळवलास!

देहू : अहो, ह्या तांबड्या मातीला मुल्तान माती म्हणतात!

जिवाजी : मुलतान माती म्हण नाहीं तर सुल्तान माती म्हण. अशानें मातीला मोल येतें वाटतें ? वांकड्यातिकड्या उड्या काय मारतोस, ही मुंडेछाट पेहरण काय घालितोस, असें पचंगी धोतर काय नेसतोस! कायरे हें ? तसेंच, गुद्द्याच्या मारानें मुरडलेल्या कानांचीं शुद्ध धिरडीं झाल्यामुळें तुझी कानउघाडणी करणें रामदासालासुद्धां साधलें नसतें ! अरे, तूं चांगला पांढरपेशा ना ?

देहू : आमचा पांढरापेशा या मुल्तान मातीखालीं पार दडून गेला आहे आतां! मुल्तान मातीचीं पुटांवर पुटें चढून बजरंगबलीच्या रंगांत मी इतका बुडालों आहें, कीं माझ्या पुढच्या सात पिढ्या उपजत तांबड्या निपजतील! अहो, फुकट होत नाहीं देहाची तयारी ! अशी मेहनत करावी लागते !

जिवाजी : तुझ्या देहाच्या तयारीसाठीं तुझ्या जातभाईंना मात्र खरी मेहनत पडेल ! तुझे मरण म्हणजे तुझ्या गोतावळ्यावर प्राणसंकटच म्हणावयाचें ! आणि तसेंच, जाळायला उभ्या गांवांतल्या वांसे-तुळया पुरायच्या नाहीत, कीं पुरायला खासें गांवठाण पुरायचें नाहीं ! तुझ्या अंगाचें हें धटिंगण धूड पाहिलें म्हणजे पहिल्यानें एवढेंच मनांत येतें, कीं हा पुरुष अंतकाळीं बाभुळबनाच्या वणव्यांत सांपडून मरावा ! खरें सांगतों तुला, मरतांना जिवाबरोबर शरीरालाही न्यायची देवानें वहिवाट घातली असती, तर तुझ्या बाबतींत यमदूतांना आपला बोजा खास झेंपला नसता आणि तूं चिरंजीव झाला असतास! काय अवीट अंग रे हें !

देहू : वाः ! जिवबा, मग शरीर कमावणें वाईट आहे वाटतें ?

जिवाजी : वाईट नाहीं तर काय ? शरीर कमावून बसायचें पण अक्कल गमावून बसायचें ! हें अवलक्षण शुद्ध बेवकुफाखेरीज तिसऱ्याच्या मनीं येणें नाही कधीं ! हें कसलें शरीर कमावणें ?

देहू : कसलें शरीर कमावणें ? अहो, नाक उडवायची बाब नाहीं ही. आज या देहांत बारा रेड्यांची ताकद खेळते आहे ! उगीच नाहीं !

जिवाजी : त्या ताकदीबरोबर बारा रेड्यांचा रगेल मूर्खपणा पण सामावला आहे तुझ्या देहांत ! कशाला रे हवी एवढी ताकद ?

देहू : ताकदीवांचून मुलखांत पुंडाई करतां येते वाटतें ?

**जिवाजी :** पुंडाई करायची ? म्हणजे पुंडाई करण्यासाठीं हा इतक्या मांसाचा असा अवाढव्य अवतार आहे का ? पुंडाई कां करायची ?

**देहू :** पुंडाई कां करायची ? पंत, जिवाची गोष्ट सांगूं तुम्हांला ? जरा हेरून पाहा बरें, मी पुंडाई कां करणार आहें ती ! कां ? बुद्धीला ठाव लागत नाहीं ?

**जिवाजी :** नाहीं बुवा. आपली मति हरली !

**देहू :** हरली; अगदीं चीत ! बजरंगबलीकी ! शिवाजी सोळा वर्षांचा झाला नाही तोंच त्यानें आडदांड लोकांची संगत धरून मुलखांत पुंडाई आरंभिली !

**जिवाजी :** बरें मग ? असें अवसान भरल्यासारखें काय करितोस ? कां आग्लाड्यांतला एखादा शेंदरा सैतान संचारला आहे तुझ्या अंगांत ?

**देहू :** शेंदरा सैतान नाहीं–शिवनेरीचा शिवाजी संचारला आहे ! सही थोरल्या राजासारखी पुंडाई करून हा देहू शिवाजीराजा होणार ! बजरंगबलीकी जय !

[ भराभर करेल फिरवितो. ]

**जिवाजी :** ए, ती करेल ठेव खाली ! तें भीमसेनी लाटणें फिरवून विराटघरींच्या पोळ्या लाटायच्या आहेत वाटतें ?

**देहू :** नाहीं. आल्यागेल्याची कणीक तिंबून दिल्लीची दौलत लाटावयाची आहे ! मला शिवाजी व्हायचें आहे !

**जिवाजी :** तें कसें काय व्हायचें ?

**देहू :** राजांच्या पावलांवर पाऊल टाकून ! आडदांड लोकांची संगत करून ठेविली आहे; पुंडाई चालू आहेच; हमरस्त्यांत मारामारीशिवाय पाऊल टाकीत नाहीं पुढें ! आतां चार गड घ्यायचे, कुठें तरी कुणाच्या अटकेंत गवसायचें, बुरडी पेटाऱ्यांतून पसार व्हायचें, नांवाचीं नाणीं ठोकायचीं अन् सोन्याचा पुतळा लुटवायचा, कीं एकदम बजरंगबलीकी ! अहो, धिमेधिमे मी थेट थोरल्या राजांची छबीसुद्धां वठवून देतों बघा ! रोज सकाळीं ओढओढून नाकाला गरुडाच्या चोंचीसारखी अणकुची आणतों; खरें म्हटलें तर आमची पहिलवानपेशाची शेंडी म्हणजे शिवराईएवढी असायची ! पण राजांसारखी केंसाळ ऐट साधण्यासाठीं हा डोकीभर संजाब ठेवून दिला आहे असा ! जिरेटोपाला जोड देण्यासाठीं वडिलांच्या पागोट्याच्या दीडशें हातांच्या चाकांतून तेवढी कोकीच काढून डोकीवर चढवायची आहे ! वाघनखें नाहींत

म्हणून तूर्तास मी मांजरीच्या नख्यांवरच भागवून नेत आहें !

**जिवाजी :** ( स्वगत ) अस्सें ! या रक्तामांसाच्या चालत्या किल्ल्याची गनिमी माऱ्याची ही जागा आहे तर ! देवाघरची योजना चहूंकडे सारखी असते खरी ! बढत्या ताकदीचा असो, कीं चढत्या अकलेचा असो; असा म्हणून एकही सिंहगड सांपडायचा नाहीं, कीं ज्यावर घोरपड लावायला द्रोणागिरीचा कडा नाहीं ! या स्वारीला या जाळ्यांत गुरफटलेंच पाहिजे ! (उघड ) शाबास ! मग तूं हुबेहूब शिवाजी होणार तर ?

**देहू :** यांत काय शक ? अहो, मरतांना गुडघा मोडून घ्यायलासुद्धां मी एका पायावर तयार आहें. जनमकाळीं तेवढी गोष्ट हातची गेली ! अगदीं कळत नव्हतें इतक्या लहानपणीं माझा जन्म झाला म्हणून फसलें हो; जरा समजूत असती किनाही त्या वेळीं, म्हणजे शिवनेरीवरच जन्मास आलों असतों मी ! पंत, आतां आलें का धोरणांत, मीं कशासाठीं शरीर कमावलें एवढें ते ?

**जिवाजी :** पण कायरे, नुसत्या अंगबळानें तूं कसा होणार छत्रपती ?

**देहू :** अंगबळानें नाहीं, तर हत्तीघोडे लागतात का छत्रपती व्हायला ? जरा अंगींपिंडीं भरला गडी कीं झाला शिवाजी !

**जिवाजी :** अगदीं वेडा आहेस ! बेटा देहू ! नुसत्या ताकदीनें नाहींत होत असलीं कामें; त्याला श्रीकलमेश्वराची कृपा असावी लागते !

**देहू :** हा कलमेश्वर कोण ?

**जिवाजी :** आम्हां कलमदान्यांचा कुळस्वामी ! आमच्या परसांतल्या बोरूच्या बेटांतला एक दगड आणून आमच्या वडिलांनीं त्याला देव्हाऱ्यांत पुजला आणि त्याचा श्रीकलमेश्वर केला.

**देहू :** पंत, कसला तुमचा कलमेश्वर आणि काय वसुलाची त्याची कृपा ! हो म्हटल्यां दगडाचा देव होतो का कुठं ?

**जिवाजी :** कां होऊं नव्हे रे त्यानें देव ! अरे, प्रयागजी अनंताला यवताच्या म्हणजे कळकाच्या बेटांत एक स्वयंभू शिवलिंग सांपडलें, त्याचा नाहीं का त्यानें यवतेश्वर केला ? अरे, अशा कळकट कंकराचा जर शंकर होतो, तर मग आमच्या कलमेश्वरावर तरी कां धोंड यावी ? ( लेखणी दाखवून ) हा पाहिलास आमच्या कलमेश्वराचा त्रिशूळ ? छत्रपती व्हायला या कलमाचें बळ असावें

लागतं. नुसत्या अंगमस्तीनें नाहीं भागत !

देहू : हा बोरूचा तासलेला तुकडा म्हणजे तुमच्या कळमेश्वराचा त्रिशूळ का ? अहो, माझ्या निम्म्या शिणेचा गडीसुद्धां तुमचें हें बोरूचें पेरें करंगळीच्या पेरानें पिचून टाकील !

जिवाजी : तसं होण्यापूर्वीं हाडांचीं काडें पिचून निघतील वेड्या ! अरे, या कलमाचें म्हणजे सामान्य महत्त्व नाही बरं ! या कलमाच्या करामतीनें होत्याचें नव्हतें आणि नव्हत्याचें होतें करून दाखवितां येतं ! जादुगाराच्या नळकांड्याप्रमाणें या टीचभर कलमामध्यें काय काय इल्मा खेंचून भरल्या आहेत, त्याची तुला कल्पना नाहीं ! जादुगिरी नजरबंदीनें दृष्टि फसते; पण कारकुनी कलमबंदीनें सृष्टि फसते ! दीन दुनिया तुमच्याबद्दल कुरकुर करायला लागली तरी बेफिकीर राहतां येईल; पण कारकुनी कलमाची घडीभराची कुरकुर जन्मभर भोंवल्यावांचून राहायची नाहीं ! दोस्तांच्या दगलबाजीनें तुमच्या नांवावर काळे डाग पाडिले तर ते एक वेळ धुऊन काढणें सोपें आहे; पण कारकुनाच्या लेखणीनें तुमचें नांव खरडतांना त्याभोंवतीं सहज चार शिंतोडे उडवून ठेवले तर ते मात्र कल्पान्तापर्यंत कायमचे ! तलवारबहाद्दरांचा तांडा अंगावर चालून येत असला, तर घोडदौडीच्या दणदणाटानें इशारत मिळून तुम्हांला दडी मारून बसायला तरी अवसर मिळतो; पण कलमबहाद्दर तुमच्या घरादारावरून आपले कागदी घोडे नाचवायला लागला, तर टापांची चाहूल लागूं द्यावयाचा नाहीं !

देहू : पंत, खरेंच का इवल्याशा नळकांडींत इतकी ताकद असते ?

जिवाजी : आस्ते कदम, आस्ते कदम ! बेटा देहू, वेड्यावांकड्या बोलांनीं ही कानावरची नागीण छेडूं नकोस ! अष्टौप्रहर कानावर बसून कानीं पडेल तें ही नागीण ऐकून घेते आणि मग प्रसंग सांपडतांच शाईच्या विषानें तें ओकायला लागते ! आणि एकदा बहकली कीं बेसुमार ! वारा प्यालेलें वांसरूं आवरतां येईल, पण शाई प्यालेलें कलम कळिकाळाला आवरायचें नाहीं ! शाईची निशा कारकुनी मनाच्याच काय ती पचनीं पडेल ! ही शाई म्हणजे साक्षात् कालकूट विषाची कन्या आहे ! अन्नाचा कोळसा करून शिरें बनवायचें आणि तेजाच्या काळोखीचें काजळ त्यांत मिसळायचें, अशी अनन्वित शाईची पैदास्त

आहे ! आणि तिखट पात्याच्या धारेच्या पोटीं लेखणीचा जन्म ! वेड्या मुला, कारकुनाला बिथरवणें भल्याचें काम नाहीं ! शाईचा सोमरस आणि लेखणीची समिधा करून एखाद्याची आहुती घेण्यासाठीं कारकुनानें एक ओळ खरडली कीं ती वेदवाक्य ! ललाटींचें ब्रह्मलिखित ढळेल; पण आमचीं लिखितें अढळ !

देहू : पंत, तुम्ही तुमच्या कलमाचें एवढें महत्त्व सांगतां पण चारचौघांत कांहीं तसें पटत नाहीं ! शिवाजीराजांनीं तर कधीं कलम हातीं धरिल्यावांचूनच एवढा ग्रंथ केला !

जिवाजी : काय, काय ग्रंथ केला रे त्या शिवाजीनें ? मी म्हणतों, तसें म्हटलें तर शिवाजीनें असें केलें आहे तरी काय ?

देहू : त्रिखंडत्रिभुवन सांगेल राजांनीं काय केलें तें ! एवढी हिंदुपदपाच्छाई उठवली आणि त्यांना तुम्ही नुसता हुंकार करितां ? पंत, हें देवाघरीं रुजूं होणें मुष्कील नाहीं !

जिवाजी : आतां उघड मात पदरांत घालूं लागलों तर म्हणशील, कीं पंत, आडमाप बोलतां म्हणून ! अरे शिवाजी म्हणजे मूठ दाबल्या हातीं साडेतीन हात उंचीचा, नाकींडोळीं नीटस, काळगेल्या रंगाचा, रांकटलेल्या अंगाचा, हरहुन्नरी ढंगाचा, लिहिणें पुसणें बेतास बात, गुडघ्यांत अंमळ अधू, असा एक इसम होऊन गेला ! त्याची काय बरी मातब्बरी सांगतोस एवढी ? म्हणे हिंदुपदपाच्छाई उठवली ! काय रे, मोगलाई मोडलीन् मराठेशाही झाली म्हणून इकडची दुनिया तिकडे झाली वाटते ? शिवाजीच्या राज्यांत लिंबोणीला आंबे लागले, का शेळीनें आपली पोर वाघाच्या पेठ्याला दिली, का कणसांतून माणसें उपजली ? अरे, केलें काय शिवाजीनें असें ? मोगलाईत हुकमती केसांची टोळी दाढीखालीं लोंबत होती ती मराठेशाहींत कवटीवर चढली एवढाच लाभ ! शिवाजी नशिबाचा म्हणून नांव झालें इतकेंच ! त्यांतून तुला खरें सांगूं ? अरे, खरा मोठेपणा अशा आरडाओरडीवर नसतो ! शिवाजीची खरी लायकी चारचौघांना पुढें कळणार आहे ! त्या माणसांत कांहीं जीव नाहीं रे !

देहू : तें कांहीं का असेना, माझा तुम्हांला एकच सवाल आहे. तुमच्या कलमाच्या मदतीवांचून राजांनीं आपल्या नांवाचा एवढा ग्रंथ कसा केला तें सांगा.



जिवाजी : कारकुनी गादीचा कोपरा म्हणजे बारमहा पिकणारें पैशाचें शेत ! (पृ. १८)

**जिवाजी :** सांगूं तुला देहू ? कल्माच्या मदतीवांचून कुठल्याही ग्रंथाचें पान हलयेंच नाहीं बघ ! अरे, शिवाजी नुसता नांवाला पुढें झाला; पण खरी करणी त्या रामदासाची आहे ! त्यानें आपला दासबोध ग्रंथ लिहिला नसता, तर शिवबाचा एवढा ग्रंथ कदाकाळीं होताच ना ! आणि दासबोध ग्रंथ कशानें लिहिला सांग बघूं ? शिवाजीच्या भवानी तलवारीनें ? नाहीं ! तुझ्या आडदांड करेलीनें ? नाहीं ! दासबोध लिहिणाऱ्या लेखणीनें ? हो, घेण्यासारखी गोष्ट काय कीं, नुसत्या भवानी तलवारीच्या नाचानें मराठेशाहीला रंग चढला नाहीं; तर दासबोध लिहिणारें कल्म त्या सगळ्या भानगडीच्या मुळाशीं होतें ! आतां तूंच सांग बघूं भवानीचे हातवारे करणारा शिवाजी थोर का कल्मानें दासबोध रेखाटणारा रामदास थोर ?

**देहू :** समर्थांची ऐपतच्च भारी वाटते बुवा !

**जिवाजी :** बरोबर बोललास ! अरे, शिवाजी किस चिडीयाका नाम है ! शिवबानें जो एवढा ग्रंथ केला त्याचीं एकूणएक पानें समर्थांनीं खरडली होतीं ! अरे, माझा तर असाच होरा वाहतो कीं, शिवाजीच्या नांवांत रामदासाइतका कांहीं राम नाहीं ! आतां तुला व्हायचें आहे शिवाजी ! पण एखाद्या रामदासा-वांचून तूं कसा होणार शिवाजी ? बेटा देहू, बच्चा, बोल आतां तुझा रामदास कोण तें ?

**देहू :** ( जिवाजीच्या पायांवर डोकें ठेवून ) बजरंगबली की, जय जय रघुवीर समर्थ—

**जिवाजी :** समर्थाघरींचें श्वान, त्यास सर्वही देती मान ! बेटा देहू, अखिल त्रैलोक्य तुझ्यासारख्या कुत्र्याला मान देईल !

**देहू :** पंत, आज माझे डोळे उघडले ! पण पंत, तुम्ही समर्थांसारखे कसे, तें एकदा नीट पढवा मला. ते बाळब्रह्मचारी आणि तुम्ही तर असे कुटुंबवत्सल !

**जिवाजी :** अरे, बालपणीं म्हणजे सुमारे सात-आठ वर्षेंपर्यंत मी सुद्धां बाळ-ब्रह्मचारीच होतों. पुढें मात्र शेजारीपाजारी—

[ कावेबाजपणानें हसतो. ]

**देहू :** पंत, आतां हसण्यावारी नेऊं नका ! मला शिवाजी करण्यासाठीं तुम्ही समर्थ कसे होणार ? समर्थांना तर ल्हानपणींच लग्नाचा तिटकारा येऊन ते सावधान होऊन पळत सुटले !

**जिवाजी :** बेटा देहू, या जगांत खऱ्याकडे कोणी खोल नजरेनें बघत नाहीं! ऐन मुहूर्तावर नारायण कुलकर्णी " सावधान " ऐकून सावध झाला आणि संसार सोडून श्रीसमर्थ रामदास झाला एवढेंच काय तें लोक बघतात! पण नारायण पळाला कां याचा कुणी नीट विचार करीत नाहीं! त्याला सांगून आलेली मुलगी काय चेहऱ्यामोहऱ्याची, कुळशीलाची होती याचा कुणीं विचार केला का आजवर? अरे, बाबत अगदीं साधी आहे! समर्थांच्या गळ्यांत बांधण्यासाठीं आणलेल्या त्या लग्नाच्या घोरपडींत कांहींतरी मोठी गोम होती! आंवत्याभंवत्यांनीं नवऱ्यामुलाला खूप चिडविलें असेल म्हणून आयत्या वेळीं पोराच्या जातीनें पळ काढिला आणि दुसरें काय? सावधान कसलें नि समर्थ कसले? पुढें अशा फकिरी बाण्यानें अंगाला राख चोपडून नारायणाचा रामदास झाला, झालें. बाकी खरें म्हणशील तर समर्थांला तर ससाराची मनापासून आवड होती! कां म्हणून नाहीं विचारलेंस? तर त्यांनीं स्पष्ट म्हटलेंच आहे कीं, आधीं प्रपंच नेटका करावा आणि मग म्हातारपणीं परमार्थ पाहावा म्हणून! आणि एवढ्यासाठीच अटकळीचा मनुष्य आधी प्रपंचाचा पसारा फैलावून सोडतो! शिवाजीनें सहा बायका कां केल्या? नेटका प्रपंच साधावा म्हणून!

**देहू :** पंत, नेटका प्रपंच कसा करावा हेंच ठीक पढवा आधीं मला!

**जिवाजी :** नेटका प्रपंच शिकणें फुकाचें काम नाहीं बाबा! त्याला रुका पाहिजे! त्याला रोकड पाहिजे! तसा शिकायला तयार हो. प्रापंचिकांच्या उद्धारासाठीं समर्थांनीं जसा दासबोध लिहिला, तसा तुझ्यासाठीं मी ' कलमबोध ' लिहून टाकीन! श्रीकमलबोध! दासबोधाचीं वीस दसकें तर कमलबोधाचीं हीं वीस पेरें! कबूल?

**देहू :** मग्ग. त्याला पैसा कशाला हवा?

**जिवाजी :** दाम करी काम! दाम घेतल्यावांचून केल्या कामाचें मोल राहात नाहीं. दाम घेतल्याविना काम करणाराला नेटक्या प्रपंचाची खूण कळली असें कोण म्हणेल? कलमबोध उपदेशायला तो कसला अधिकारी पुरुष? कारकुनी गादीचा कोपरा म्हणजे बारमहा पिकणारें पैशाचें शेत! तिथें पैसा पेरावा, कामाचें पीक घ्यावें!

**देहू** : पण माझे काम करण्यासाठींसुद्धां पैसा खाणार ?

**जिवाजी** : शिवाजीजवळून समर्थांनीं साऱ्या राज्याच्या सनदा काढून घेतल्या आणि त्याला भगवीं वस्त्रें धारण करायला लावलीं ! तूं कोण ? नाणीं मोजली नाहींस तर तूं कोण ? अरे, वडिलांनीं सरकारी कामांत पैसे नापत्ता केल्याचें पहिल्यानें जेव्हां लक्षांत आलें – त्या वेळीं म्हणजे नुसता आठ वर्षांचा चिमखडा होतों—

**देहू** : वडील पण पैसे खात होते का ?

**जिवाजी** : आम्हां कल्मदान्यांत हा वडिलोपार्जित गुण आहे ! आमच्या घराण्यांतले पुरुषन् पुरुष एकाचढी एक पिढीजाद धोरणाचे होऊन गेले ! राम जसा एकबाणी — तसे आम्ही एकटांकी, म्हणजे लिहितांना टांक एकजात ! राम एकवचनी –– तर आम्ही एकचाकी, सारे एका चकारीनें रस्ता काढणारे ! तिकडे राम एकपत्नी तर आम्ही एकराखी ! किमानपक्ष एकेकाला एकेक राख ही असायचीच !

**देहू** : राख म्हणजे ?

**जिवाजी** : राख म्हणजे बायको नसलेली बायको — नाकापेक्षां जड मोतीं ! बेटा देहू, तूं अजाण बच्चा आहेस ! कल्मदाने म्हटला कीं तो एकटांकी, एकचाकी आणि एकराखी ठरलेला ! बरें, पुढें वडिलांची ही खादाड खुबी पहिल्यानें ध्यानांत आल्याबरोबर त्यांना धाक घातला, तिच्याबद्दल भरदरबारांत होळीपुनव गाजवायचा ! त्यासरशीं वडिलांनीं माथ्यांत राख घालून घरींच फाल्गुन उरकून घेतला ! अखेर, त्यांच्याकडून दुप्पट रकमेचा रोखा लिहून घेतला तेव्हां घरांतली अब्रू घरांत ठेविली ! वडिलांशीं हें वागणें; मग तुझे काय उरलें ? अरे, कारकुनी कसबाला प्रेताच्या टाळूवरचें लोणी खाणारें डोकें लागतें ! थोरल्या राणीसाहेब – सईबाईसाहेब जेव्हां मेल्या — आपलें वारल्या, तेव्हां तर या जिवाजीची तारीफच करायला हवी होती. खाजगी खात्यांतून सवा खंडी चंदनाचा हुकूम झाला; पण सवा शेर चंदनाच्या उटीनें सवा खंडी बाभळीचें चैत्री हळदीकुंकू आटोपलें आणि पंधरा मोहोरांची बचत केली ! गडावर धूम बोलवा, कीं सवा खंडी चंदनानें मातोश्रींना मुक्ति दिली म्हणून; पण खरी गोष्ट एक देवाला ठाऊक, त्या जळत्या जिवाला ठाऊक, कीं एक या जिवाला,

ठाऊक !

**देहू :** पंत, भलतेंच काय सांगतां ? इतक्या हलक्या मनानें तुम्हीं पंधरा मोहरांची मिळकत केली असें कुणालासुद्धां खरें वाटायचें नाहीं !

**जिवाजी :** नाहीं वाटायचें; साध्याभोळ्यांना नाहीं खरें वाटायचें ! " तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें ! " जातीच्या इरसालांना माझें म्हणणें बेचूक पटेल.

**देहू :** मग हें सारें खरें म्हणतां ?

**जिवाजी :** खरें म्हणजे ? अरे, मग नेटका प्रपंच कशाला म्हटलें आहे ? अमक्या कामात पैसे खायचे व तमक्यांत खायचे नाहींत, असा पंक्तिप्रपंच मुळीं प्रपंचांत चालतच नाहीं ! प्रपंचांत म्हणजे सुतळीच्या तोड्यापासून जपावें लागतें ! आता सांगूं तुला आणखी ? वडील वारले तेव्हां त्यांची तयारी चालली होती आणि आमच्या मातोश्रींनीं मंगळसूत्र तोडून टाकिलें — आमची बाळबुद्धीच; पण दूरदृष्टीची पोंच केवढी — मंगळसूत्रांतला टीचभरच दोरा, पण वावडीसाठीं काढून ठेवला ? अरे, डाव्याउजव्या हातांनीं इंद्रजाळ करीत नाहीं त्यानें लेखणी टाकून नांगर धरावा आणि आपल्या मानेवरच जोखड ठेवावें.

**देहू :** पण पंत, इंद्रजाळाच्या अशा नजरबंदींत खोडा पडून वेळेवर पायबंदी व्हायची नाहीं का ?

**जिवाजी :** पायबंदी होईल कशी ? या गोष्टीची कुठें वाच्यता करायची नसते ! कारकुनाच्या लेखणीप्रमाणें, शेंडा कापून जिभेचाही टांक तोडावा लागतो ! तुला म्हणून या अंतर्यामींच्या खुणा सांगितल्या ! जिभेचें कलम करायचें आणि कलमानें दस्तुर कुठें गुंतवायचा नाहीं ! जमा रकमेची पोंच म्हणून हातचा लेख कुणाला देणें नाहीं. कालपरवांची गंमतच ऐक; सालमजकूरची पट्टी भरण्यासाठीं एक कूळ आलें होतें ! भरणा जमा झाल्यावर कुळानें पावतीचा हट्ट घेतला. तेव्हां हलीं पट्टीची पावती म्हणून त्याला जें चिठोरें खरडून दिलें तें पेस्तरपट्टी थकल्याबद्दल वित्तविषय जप्तीचें ताकीदपत्र ! आणि दस्तुर ठोकला सरकारकुनांचा ! कुत्ता जाने, चमडा जाने !

**देहू :** सरकारकुनाचें अक्षर तुम्हांला कसें हो काढतां आलें ?

**जिवाजी :** काशीची गंगा राजापुरीं कशी रे उपटते ? अरे, देवास करणें न् दुसरें काय !

**देहू :** बरें पंत, सगळ्याच्या जवळून पैसे खातां खरें; पण हाताखालच्या माणसाजवळ हातचलाखी करणें धोक्याचें नाहीं का ?

**जिवाजी :** अरे, माझ्या हाताखालच्या माणसाची तर गोष्टच सोड. नंदीच्या शिंगांनीं शंकराचें अंग खरचटत नाहीं; पण मी ज्याच्या हाताखालचा कारकून आहें त्यालासुद्धां हात दाखवीन. तुझ्या देखतच कलुशा कबजाला कबजांत घेऊन दाखवितों बघ ! मग तर म्हणशीलना, कीं आहे !

**देहू :** पंत, ते पाहा कबजीबाबाच येताहेत.

**जिवाजी :** ( स्वगत ) अरे बापरे, ही परदेशी पीडा आमच्या घराकडे कां वळली ? दैवाच्या कळसाला जाऊन भिडला तरी उंबरठे झिजवायची खोड जात नाही ! ( प्रकट ) देहू, जरा हुशारीनें राहा ! यावें; यावें; आज— ( कबजी येतो. ) धन्यांनीं गरिबाच्या घरीं पायधूळ झाडली ! घर पावन झालें ! बेचाळिशीनें मुक्काम गांठला ! अभाग्याच्या घरीं बाबा कामधेनु आली ! ( स्वगत ) लागला नंदीबैल झुलायला !

**कबजी :** जिवबा, तुमच्या घरीं यायला आम्हांला कसला संकोच आहे ? आम्ही तुम्हांला नक्कर भाऊपणानें लेखतो ! जरा निकडीचें काम निघालें म्हणून तांतडीनें तुमच्याकडे स्वतांच आलों झालें. अहो, जिवाजी म्हणजे या कलुशाचा उजवा हात !

**जिवाजी :** ( स्वगत ) कलुशाचाच काय, पण ज्याला म्हणून लिहितां येतें त्या हरएकाचाच उजवा हात ! (प्रकट) पायांच्या चाकराला असें हातांशीं धरणें हा धन्यांचा मोठेपणा आहे ! ( एकीकडे देहूस ) बेटा देहू, आज या कारकुनाच्या घरीं कोण आलें आहे ? काय बोलतें आहे ? कसें बोलतें आहे ?

**देहू :** ( जिवाजीस एकीकडे ) बजरंगबलीकी जय !

**जिवाजी :** ( देहूस एकीकडे ) कलमेश्वरीकी जय ! स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ! ( उघड ) धन्यांना घर कसें सांपडलें पण ?

**कबजी :** कां बरे ? घर माहीत होतें ! आम्ही अव्वल अत्तरें विकण्याकरितां गडावर फेरी घालतांना तुमच्या घरीं एकदा नव्हतों का आलों ? आमच्या पेटींतली अत्तराची एक कुपी खरेदीवांचून खपली ती याच घरांत !

**जिवाजी :** त्या कुपींतलें अत्तर उडून गेलें; पण धन्यांच्या डोक्यांतून ती गोष्ट

अजून उडून गेली नाहीं ! काय तारीफ आहे ! बरें, कामाचें राहतें आहे तसेंच !

**कबजी :** काम जरा नाजूक आहे; आपलेपणानें करायचें आहे. राजश्रींनीं आज सिंधुदुर्गावर दौलतराव शिरक्याच्या तुळशीला आणली आहे !

**जिवाजी :** आलें लक्ष्यांत ! तेव्हां ती खाजगी खात्याकडे जमेस घालायची, तिची तैनात तरकीब राखायची. खलास ! हेंच ना काम ?

**देहू :** ( जिवाजीस एकीकडे ) तुळशीबाईना आणलें कसें हो पंत ?

**जिवाजी :** ( देहूस एकीकडे ) बेटा देहू , ती सरकारी सफाई आहे; हा दरबारी दरवडा आहे; हें रंगेल राजकारण आहे ! कलमबोधांत तुझ्यासाठीं या खुबीचा खुलासा करीनच मी.

**कबजी :** ( कांहीं कागद देऊन ) आणि जिवबा, हे त्या प्रकरणीं सरकारी शिक्क्याचे कागद ! पंत, या गोष्टीकडे नीट ध्यान पोंचवा. येसूबाईसाहेबांची आपल्यावर ठीक कदर नाहीं; तेव्हां गोषांत अशी दुफळीची गडबड उडाली तर एका फळीच्या आधारावर या तुफानांतून आपल्याला सलामत तरून जातां येईल. दरबारांत अजून आपल्याविरुद्ध थोडी आग धुमसते आहे. तो साबाजी शिरके, हिरोजी फरजंद, ही माणसें आपल्या बऱ्यावर नाहींत ! तो बेवकूब रायाजीसुद्धां जरा बांकूनच असतो. त्याच्या प्रेमाच्या वेडाबद्दल राजश्रींकडे एकदा बोलणं काढून त्याला कामावरून काढण्याचा माझा मनसुबा आहे. सेनासागराच्या जागेसाठीं चांगलासा मनुष्य हेरून ठेवा ! हो, वेळेवर अडचण नसावी !

**जिवाजी :** ठीक आहे; ऐसा खासा जवान आणून देतों, कीं ज्याचें नांव तें !

**कबजी :** बरें तर, मी जातों आतां. राज्याचा बंदोबस्त नीट ठेवा ! [ कबजी जातो. ]

**जिवाजी :** ठीक आहे ! बेटा देहू , हो पुढें आतां. आज मराठ्यांचा सेनासागर, रायगडचा सेनापति कोण आहे ? तूं आहेस ? नाहीं ! सुभेदार तानाजी मालुसऱ्यांचा रायाजी आहे ? आहे. उद्या मराठ्यांचा सेनासागर कोण ? रायाजी ? नाहीं ! तूं आहेस ? हो ! कोणाचें नांव उद्यां पुढें करणार मी ? बोल, बेटा देहू , बोल !

**देहू :** बोल बजरंगबलीकी जय ! [ करेल भराभर फिरवितो. ]

**जिवाजी :** एका दिवसांत उनाड पोऱ्याचा सेनासागर कसा होतो हें श्रीकलमेश्वराच्या कृपेनें तूं पाहिलेंस ! आतां उद्यांची बात उद्यां ! देहूचा रायाजी,

रायाजीचा शिवाजी! देहू, हें कलम काय करीत नाहीं? पहिलवानी करून काय होणार? तुम्हीं पहिलवानांनीं रोजीं हजार बैठका मारण्याचा सराव केला, तरी कारकुनापुढें तुम्हांला उठून उभें राहणें भाग आहे! तुमचे कान नापत्ता झाले असले तरी कारकून त्यांना उपटून ठिकाणावर आणल्याखेरीज सोडायचा नाही. तुमचं गर्दन रुंदावलें तर कारकुनाला तुमच्या मानगुटीस बसणें सोईचं पडतं. तुमची शेंडी अगदीं शिवराईएवढी करा, कीं तिचं हवें तर दुसऱ्याच्या डोक्यावर कलन लावा, ती नेहमीं कारकुनाच्याच हातीं राहणार!

**देहू :** पंत, तुमच्या कलमाची करामत पाहून आमचा नक्षा उतरला! पंत, मी तुम्हांला सर्वस्वीं शरण आहें! मला तुमचा गुरूपदेश करा!

**शिवाजी :** त्या सलकड्यांच्या सनदा काढून माझ्या झोळींत टाक! गुरुकृपा फुकाची नाहीं!

**देहू :** ( सलकडीं शिवाजीस देतो. ) सद्‌गुरूच्या चरणीं अर्पण असो!

**शिवाजी :** चरणीं नाही–हातीं! बेटा देहू, भाषा हमेष बेतशुद्ध असावी! आज तुला आमच्या धर्माची दीक्षा देतों! आजपासून माझ्या संध्येची तूं व्यवस्था ठेवीत जा!

**देहू :** बस्? एवढेंच काम? संध्येसाठीं पळीपंचपात्री आणून ठेवायची?

**शिवाजी :** धीरे, धीरे, जरा धीरे! बेटा देहू, मी शक्तीचा उपासक आहें! माझी संध्या साधीसुधी नाहीं! आम्ही दारूच्या पाण्यानें आचमन करतों आणि स्मरणीचे मणी ओढण्याऐवजीं गोमुखींत—कान कर इकडे! अरेरे, तुला चांगलेंसे कानसुद्धां नाहींत; तुझ्याशीं कानगोष्ट करायची तरी कशी?—गोमुखींत सागोतीचे कबाब ठेवायचे असतात! ही उपासना कोणाला सांगितलीस तर तुझ्या मुलतान मातीसकट तुझ्या अंगाची राखरांगोळी करीन! सेवेला उतरलास तर शिवाजी होतोच आहेस! बोल, आहे कबूल?.

**देहू :** मी आतां सर्वस्वीं आपला शिष्या आहें! पंत, माझें आणखी एक काम मात्र आहे!

**शिवाजी :** आम्ही ओळखतों; अगदीं मनांतलें ओळखतो; चांदणी नांवाच्या पोरीसंबंधानें बोलणार आहेस ना तूं?

**देहू :** सत्य आहे! पंत हें कसं ताडलें तुम्हीं?

**जिवाजी** : तें राहूं दे! ही कलमेश्वराची कृपा आहे! चांदणीच्याबद्दल मी तुझ्यासाठीं खटपट करीन. बरें, चल आतां. संध्येबद्दल नीट व्यवस्था ठेवणार ना तूं? तसेंच उद्यां रायाजीच्या जागीं उभा राहणार ना तूं?

**देहू** : बजरंगबलीकी जय!

[ दोघे जातात, पडदा पडतो. ]

## प्रवेश तिसरा

[ स्थळ : साबाजी शिरक्याचें घर. पात्रें : ज्ञानेश्वरी वाचीत असलेला साबाजी; हुक्का तयार करीत असलेला हिरोजी फरजंद. ]

**साबाजी** : ( एकेक अक्षर लावून. ) "माझा मराठाचि बोल निकें। परी अमृतातेंहि पैजा जिंके। ऐसीं एकेक अक्षरें रसिकें। मेळवीन." वाहवा! अमृतातेंहि पैजा जिंके, ऐसीं अक्षरें मेळवीन! काय एकेकाचा हातगुण असतो. ज्ञानोबारायांनीं भलतीशी पैजहोड घातली आणि अक्षरान् अक्षरांशीं खरेपणाची मिळणी केली. हिरोजी, एक हें : "माझा मराठाचि०"

**हिरोजी** : साबाजी, असलें एकेक अक्षर मेळवायला त्यांना वेळ लागला नसेल तितका तुला तें लावायला वेळ लागतो आहे. ज्ञानोबारायांना रेड्याकडून वेद वदवायला इतका सायास खचित पडला नसेल.

**साबाजी** : हिरोजी, भाग्यवंताच्या घरच्या गोष्टी, तुम्ही आम्ही बोलायच्या आतां! आळंदीच्या विधात्यानें शेंद्रीच्या रानमाळांतल्या मराठी दगडांनीं देवपूजा रचिली; शिवनेरीच्या शिवशंकरानें मावळच्या माकडांना अमृताला लाथाडणारें देवरूप दिलें! अमृताशीं आळी करणारी एकाची वाणी, तर अमृताला औषध चारणारी दुसऱ्याची करणी! ज्ञानोबाची मराठी वाणी, शिवबाची मराठी करणी — दिगंत उजळून दोघांनीं ऐन मराठी हांकेनें भूमंडळ गाजविलें. मराठी मोहनीनें जीवकोटीला भारून टाकलें. आज आठ वर्षें झालीं; अजून राजांच्या नांवाची निशा उतरत नाहीं!

**हिरोजी :** बरें, पुराणिकबुवा ! आतां गुडगुडीची गोड गंमत घ्या कीं जरा. हं, ही घे.

**साबाजी :** जरा थांब. सोवळ्यानें गुडगुडी ओढणें पाप आहे.

( अपूर्ण )

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ तुळशीच्या पहिल्या रुकाराचें स्वतांशीं स्मरण करीत असतांना. ]

**संभाजी :**

[ चाल—जरि नाहि कमल तें करीं० ]

तो एकच प्यारा बोल । मनीं या खोल । जाउनी बसला ।
हृदयावर कायम ठसला ॥ १
लाखाचें ज्याचें मोल । असा तो बोल । बोलत्या काळा ।
शोभलीस राजसबाळा ॥ २
तो डावा डोळा—अहा । पुन्हा हा पहा । झांकला अरधा ।
करि जिवास मोहनबाधा ॥ ३
भिंवईची तिरपी तऱ्हा । मुरडुनी जरा । त्यावरी ढळली ।
टोंकाशीं कांहीं चळली ॥ ४
हसतांना थोडें कुठें । गाल तो उठे । आणि त्या भारें ।
निपजली मजा परभारें ॥ ५
त्या रेघा चिमण्या भल्या । तोंच उमटल्या । तीन कीं दोन ।
डोळ्याचा साधुनि कोन ॥ ६
तों भरून आला ऊर । रंगरसपूर । चालला श्वासें ।
ओंठावर अडलें हासें ॥ ७

भयभीत नवा आनंद; । पदर बेबंद । कंप कटिबंधा ।
जिव झाला अरधा अरधा ॥ ८
नवतीची राजस लाज । गुलाबी साज ।-और तो कांहीं ।
गालांवर चढवी दोहीं ॥ ९
थरथरत्या ओंठावरी । प्रीत बावरी । बोल तो टाकी ।
नजरेचा पडदा झांकी ॥ १०
तो एकच प्यारा बोल । जिवाचें मोल । घेउनी फिरुनी ॥
एकदा ऐकवा कानीं ॥ ११

*अंक तिसरा समाप्त*

# अंक पांचवा

## प्रवेश पहिला.

[ सोन्याच्या सांखळ्या हातांत घेऊन उभी असलेली येसूबाई व लोखंडाची बेडी हातांत घेऊन उभी असलेली तुळशी. दोघी एकमेकींकडे पाहात आहेत. आसपास नोकर वगैरे. ]

[ पडद्यांत ]

" मोऱ्यांनीं मात केली ! राजाला गिरफदार केलें !
" मोऱ्यांनीं शर्थ केली ! संभाजीला कैद केलें ! "

[ येसूबाई सोन्याच्या सांखळ्या व तुळशी बेडी एकमेकींकडे टाकून देतात. ]

**येसूबाई** : ऐकायचें नव्हतें तें ऐकिलें !

**तुळशी** : ऐकायचें होतें तें ऐकिलें ! ( पदरचा दगड काढिते. ) दर्यासागर दौलतराव, तुमच्या अर्धांगीनें आपली प्रतिज्ञा पूर्ण केली ! केवळ कबजी-सारख्यांच्या मसलतीनें आणि मोऱ्यांसारख्यांच्या मदतीनें सुताचा साप आणि सुईचा सूळ करून, या तुळशीनें केला करार पुरा केला ! त्या दिवशीं तुमच्या बापानें तुमच्या देहाची दैना केली तेव्हां, तुमच्या जित्या रक्तानें रंगलेला हा दगड, तुमच्या जात्या जिवाच्या साक्षीनें, या तुमच्या धर्मपत्नीनें, तुमच्या क्रियाकर्मासाठीं जीवखडा म्हणून उचलून घेतला. दर्यासागर ? तुळशीभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या आपल्या जिवाचा कान करून ऐका ! त्या वेळचे माझे बोल आज पुन्हा आठवा. या दगडाला उरापोटाशीं धरून, याच्या संगतीनें छातीचा दगड करीन; तुमच्या प्रेताच्या काळ्या भेसूरपणाच्या शपथेनें जिवाचा वेतळ।

करीन; दख्खनी दुनियेचें दारूकाम बनवून त्याच्या आतषबाजीनें तुमच्या सर णाचा भडाग्नि चेतवीन; भोसलेशाहीच्या मानकऱ्यांना या होळीचे होळकर करीन; मराठेशाहीची माती करून तिनें तुमच्या जिवाला मूठमाती देईन; संभाजीच्या बायकोला—मराठ्यांच्या महाराणीला गाय करून, तुमच्या नांवानें मोगलांच्या हातांवर तिचें गोप्रदान सोडीन! बोला, दौलतराव, दिल्या कोलांतला बोलन् बोल खरा केला ना? कोण आहे तिकडे? धरा या राणीला आणि सव्वाशेर सोन्याच्या साखळ्यांच्या जागीं तो सव्वा मणाचा लोखंडी लंगर तिच्या पायांत अडकवा.

[ दोघेतिघे नोकर पुढे येतात; एकदम दुसऱ्या बाजूनें हिरोजी व शाहूमहाराज येतात. ]

**हिरोजी :** हां, खबरदार; पुढें पाऊल टाकाल तर पावलापावलासाठीं प्राण गहाण ठेवावा लागेल! मासाहेबांच्या अंगाला हात लागला तर त्या हाताचें कलम करून टाकीन; मासाहेबांकडे वांकड्या नजरेनें पाहिलें तर तापल्या सळईनें डोळे काढून खेळायला देईन!

[ नोकर थबकतात. ]

**तुळशी :** काय मर्दांची जात आहे पाहा! अरे, चांगले पुरुषासारखे पुरुष होऊन या एका थेरड्याच्या तोंडाकडे पाहून हाय खातां? त्या वेळीं माझा घात केलास; आज बाजी बदलली आहे! आज तुझ्यासारख्या हलक्या हुजऱ्याची ही पोरगी राजावांचून राणी झाली आहे आणि ही तुझी राणी मोऱ्यांची बटीक झाली आहे! आतां मान वर करून असा पाहूं लागलास तर तुझ्या पांढऱ्या केसांचाच तिला गळफांस बसेल!

**शाहू :** ( तलवार अर्धी उपसून ) मासाहेब, हिच्या वेफाम जिभेचे या तलवारीनें तुकडे तुकडे करून —

**येसूबाई :** ( त्याला थांबवून ) भलतेंच! वाटेल त्या बोलभांड बायकोच्या जिभेबरोबर तुमच्या तलवारीला नाचवायची आहे का? धाकटे महाराज, थोरल्या आबासाहेबांच्या श्रीभवानी तलवारीच्या नमुन्याची ही बाळभवानी मुहूर्तावर स्वतां खाशांनीं तुमच्या कमरेला बांधिली ती एवढ्यासाठीं वाटतें? हिनें मराठेशाहीची एकछत्री इभ्रत राखायची आहे; बायकांच्या जिभेसारखें वळवळायचें नाहीं. बायकांच्या बडबडण्यानें उद्यांच्या छत्रपतीचें मन ढळत नाहीं!

**तुळशी :** येसूबाई, बायकांच्या बडबडण्यानें पडलेला फांसाही चळत नाहीं! तुझ्या चढेल मोठेपणाला पायमाल करायला आतां कितीसा वेळ लागणार? (नोकरास) अरे, आणा त्या सांखळ्या इकडे! पुन्हा त्या म्हाताऱ्याकडे पाहतां? मोऱ्यांनीं ही नामर्दाची पैदास कोठून जमा केली? ही पाहा दर्यासागर दौलतरावाची मर्दानी विधवा मराठेशाहीचें हें अहेव लेणें आपल्या पायांनीं तुडवून टाकीत आहे.

[ सांखळ्या पायांत घालूं लागते. ]

**हिरोजी :** तुळशी, कारटे, काय केलेंस हें? पिंडीला पाय लागला तर पायबंदीच होईल अशी साधी सजा एकट्या राजांनाच फर्माविली होती; पण दुसऱ्या देहाला मात्र या आई भवानीच्या भंडाराला असा पाय लागला तर जिवानिशीं जायबंदी व्हावें लागेल. या फरजंदाच्या घराण्यांत, रक्तमांसाच्या जिभेनें जें बोलावें तें पोलादी जिभेनें करावें असा कुळाचार आहे. [ कमरेची तलवार काढितो. ] (स्वगत) तुळशी, कमरेची मिठी सोड! राजांनीं भवानी आईच्या साक्षीनें श्रीभवानी तल्वार उचलली, त्याच मुहूर्तावर साबाजीनें बिजली आणि हिरोजीनें ही तुळशी उचलली. बेइमान दौलतरावाच्या गळ्यांत पडतांना साबाजीची बिजली इमानाला जागली! बेटा तुळशी, आजवर तुला कडेवर खेळविली, आज इमानाला जागी हो! तुझी नांवरस सांगून तुझ्या नांवाला बट्टा लावणाऱ्या फरजंदांच्या या कमअस्सल अवलादीला, केवड्याच्या बनांतल्या या सुंदर नागिणीला, एक-घाय उभी चिरून टाक! (उघड) मासाहेब, ती पाहा, दिवसाढवळ्या केवढी चांदणी तुटून पडली!

[ तुळशीच्या विरुद्ध दिशेकडे बोट दाखवितो. येसूबाई वगैरे तिकडे पाहतात. हिरोजी तुळशीला वार करतो. ती पडते. ]

**येसूबाई :** कुठें पडली चांदणी?

**हिरोजी :** [ तुळशीकडे बोट दाखवून ] ही पाहा!

**तुळशी :** करायचें तें केल्यावर मरण आलें तरी बेहत्तर आहे! हिरोजी, पोटच्या पोरीवर घाव घालतांना तुझ्या डोळ्याला पाणी आलें नाहीं! जिव्हारीं घाव जाऊन बसला तरी तुळशी रडणार नाहीं! दर्यासागर दौलतराव, लग्नानें तुमच्या नांवाशीं जखडलेली तुळशी तुमच्या ऋणांतून मोकळी झाली! [ दगडावर

बांगड्या फोडून ] दुबळ्या दौलतीच्या नांवानें भरलेला वज्रचुडा त्याच्याच जीव-खड्यावर फोडून टाकून साता जन्मांच्या संसाराच्या साखळदंडांतून ही तुळशी आज सुटून जात आहे! देवा, पुढल्या जन्मीं मला मराठेशाहीच्या जवान-मर्दांची—रायगडच्या रणमर्दांची—माझ्या छत्रपति संभाजीमहाराजांची शृंगारदासी कर! छत्रपति संभाजीमहाराज, या जन्मीं, आपल्याला पाहिलें, आतां पुढल्या जन्मीं, शृंगारदेवा,—तुळशीच्या परमेश्वरा, मला पदरांत घ्या! कुणीतरी छत्रपतींना माझा शेवटचा निरोप सांगा कीं, तुळशीनें मरतांना देवाचें नांव घेतलें नाहीं; पण तिचा मरता बोल " छत्रपति संभाजीमहाराज "—[ मरते. ]

**येसूबाई :** हिरोजी, काय केलेंत हें!

**हिरोजी :** मासाहेब, हे ऋणानुबंधाचे लागेबांधे आहेत! साबाजीच्या पोटीं दौलती आला; त्यानंतर एका वर्षाच्या आंत ही माझ्या पोटीं आली. साबाजीच्या हातून दौलती मेला; त्या एकाच वर्षाच्या मुदतींत ही माझ्या हातून मेली. या तुळशीला आजवर परक्या रक्तानें पोसली, तिच्या अंगांत माझें जातिवंत रक्त खेळत होतें; आज या तुळशीची माझें रक्त पिण्याची हौस फेडून टाकिली.

[ पडद्यांत–कोणत्या हरामखोरानें तुळशीच्या अंगाला हात लावला ? ]

**हिरोजी :** मासाहेब, जरा आडबाजूला व्हा! देवळांतल्या देवाला दगलबाजीनें विटाळणारा हाच तो हरामजादा मोरे!

[ मोरे प्रवेश करतो. ]

**मोरे :** कोणीं तुळशीच्या अंगावर वार केला ? तुळशीच्या रक्ताच्या थेंबागणिक त्या गुन्हेगार देहाचे तुकडे केल्याखेरीज मोऱ्यांची तलवार विसांवणार नाहीं. कोणीं केला खून हा! [ नोकर हिरोजीकडे बोट दाखवितात. ] हिरोजीनें ? म्हातारचळाच्या नादांत तुझ्या तलवारीची तहान बेसुमार वाढल्यासारखी दिसते. कोणाचें रक्त तुझ्या तलवारीला लागलें आहे हें ?

**हिरोजी :** हें माझें रक्त आहे—हिरोजी फरजंदाचें इमानी रक्त आहे हें!

**मोरे :** थेरड्या, मग तुळशी कशी मेली ?

**हिरोजी :** देवास कळे! माझें जातीचें रक्त तेवढें मीं काढून घेतलें! तिच्या बाकीच्या बेइमान रक्तामध्यें जितेपणाचा जिव्हाळा नव्हता. नुसत्या मुर्दाड

मांसानें माणूस जगत नाहीं!

**मोरे** : हा पाहा, तुझ्या जिवंत मांसाला मातींत मिसळून तुझा बोल खोटा करून टाकतो! (तलवार उपसून धावतो)

**येसूबाई** : हां, छोटे छत्रपतीमहाराज, आतां खुशाल आपली तलवार उपसा आणि आपल्या इमानी नोकराच्या धावण्या धावा! तुमच्या प्राणांची रया झाली तरी हरकत नाहीं; पण हिरोजींच्या थकलेल्या केसांना धक्का लागूं देऊं नका!

[ शाहूमहाराज हिरोजी व मोरे यांच्यामध्यें येतात. ]

**हिरोजी** : मासाहेब, काय हा अविचार! धाकट्या राजांना मागें घ्या!

**शाहू** : पुढें पाऊल टाकिलें तें मागें घेण्यासाठीं नाहीं. वीरांचें तुटलेलें मस्तक मागें पडतें, पाऊल कधीं पडत नाहीं! भोसल्यांच्या तीन पिढ्या तुम्हीं हातांवर वाढविल्या; तुमच्या सेवेची कसोटी आणखी किती पाहावयाची? चला, मागें सरा; मी तुमचें संरक्षण करणार! मासाहेब, पाहा बरें हिरुबाबा कसे ऐकत नाहींत ते! हिरोजी, तुझा राजा तुला मागें होण्याचा हुकूम करीत आहे! मराठेशाहीला हें दिसलेंच पाहिजे कीं, आपल्या इमानी नोकरांवरचा तलवारीचा ताप चुकविण्यासाठीं छत्रपति आपल्या अंगाचें छत्र करीत असतात!

**हिरोजी** : ( मोऱ्यांना उद्देशून ) जावळीच्या रानांतल्या जातीच्या दगडा, या बोलांनीं विरघळून तुझें पाणीरे कसें होत नाहीं? ( शाहूमहाराजांना उचलून त्यांचा मुका घेतो. ) आई, आई, आई, राजे, ही पोपटपंची कुणीं बरें पढविली आमच्या रायगडच्या चिमण्या राघूला! [ शाहूमहाराजास खालीं ठेवितो ] देवा, माझ्या बाळराजांना अठ्ठावीस युगांचें आयुर्दाव दे! मासाहेब, आमच्या जिवाच्या मीठ मोहऱ्या ओंवाळून यांची दृष्ट काढा! आनंदाच्या आंसवांनीं डोळे भरून आले नसते तर माझीच यांना नजर लागली असती! भोंसल्यांचे वंशांतला हा कुळदीपक पदराखालीं झांकून घ्या आणि जरा बाजूला व्हा!

**येसूबाई** : फरजंद, तुमच्यावर अशी काळाची कट्यार लटकत असतांना तुमच्या राजानें आपल्या अंगाची ढाल करायला नको का? तुम्हांला असें टाकून



हिरोजी : मासाहेब, ती पहा, दिवसाढवळ्या केवढी चांदणी तुटून पडली ! (पृ. ३०)

आम्हीं कुठें तोंड दडवावें ?

**हिरोजी** : ( एकदम रागानें ) मुली, मोठेपणाला प्रसंगीं तरी कांहीं सीमा हवी ना ? तुझ्या सासऱ्यानें माझा बोल खाली पडूं दिला नसता, आणि तूं गुडघ्याएवढी पोर मला म्हाताऱ्याला गोष्टी सांगतेस ! रायगडच्या राउळांतला हा नंदादीप आम्हांला आमच्या जिवांच्या ज्योतींनीं पाजळता ठेविलाच पाहिजे ! हा जीव सलामत असला तर उद्यां मुडद्यांचीं माणसें करतां येतील. चल, घेऊन जा याला तिकडे ? मुली, बोलूं नये तें बोलावयास लावतेस ? म्हातारपणीं माझें मोल केलेंस ? प्रसंग काय आणि तुझें बोलणें काय ? पोरीच्या जातीला असा हट्ट शोभत नाहीं. चल एकदम पुढें !

[ येसूबाई शाहूमहाराजांसह जाऊं लागतात. ]

**हिरोजी** : ( गहिंवरून ) मासाहेब, जरा थांबा ! अखेरवेळीं या थेरड्याची जिव्हा चळली; गुन्हा माफ करा ! काळाची करणी कडू असते; पुन्हा गांठी पडणें केवळ दैवाधीन ! तुम्हां दोघांना डोळे भरून एकदा पाहूं द्या; ओथंबलेल्या अंतःकरणाच्या आशीर्वादानें तोंड गोड करून घेऊन मग चला ! [ कांहीं वेळ त्यांच्याकडे पाहतो ] हाय रे कर्मा ! हीं देवमाणसें आतां देवाघरीं सुद्धां दिसायचीं नाहींत. मासाहेब, आजवर या तापल्या जीवाला आपल्या नजरेनें न्हाऊं घातलें; आज पुण्याई सरली; इथून आपलें दर्शन अंतरलें ! मासाहेब, बाळराजांना जिवापाड जपा; चला पुढें !

[ येसूबाई व शाहूमहाराज जाऊं लागतात. ]

**मोरे** : हां, येसूबाई, थांब ! भोसल्यांच्या जनान्याचा गोषा उडवून टाकण्याचा मोऱ्यांनीं विडा उचलला आहे ! अरे, पकडा रे या बाईला आणि या पोराला !

**हिरोजी** : तो विडा चघळल्यावांचून, नुसतें तोंडच नाहीं, पण सारें अंग रंगून निघेल. मोरे, तुझ्या चांडाळ जिभेनें या देवतांचीं नांवें बाटवूं नकोस; या नामसंकीर्तनाचें पुण्यसुद्धां या वेळीं तुझ्या फळास येणार नाही. हिरोजीच्या तलवारीला माणसाची मुरवत नाहीं, घरत्या हाताची हुकमत नाहीं ! मासाहेबांना मुकाट्यानें जाऊं देत ! मासाहेब, आतां थांबाल तर तुम्हांला थोरल्या राजांच्या पायांची आण आहे.

[ येसूबाई व शाहूमहाराज जातात. ]

**मोरे :** हिरोजी, तुझ्या खिळखिळ्या हाडांचा खुळखुळा करून मोऱ्यांचीं मुलें-सुद्धां खेळत बसणार नाहींत! तुझ्या छातींत अशी एक लाथ मारून तुला वाटें-तून बारा गांव पलीकडे उडवीन!

**हिरोजी :** राजांच्या रायगडचा दगडी हाडांचा किल्लेकोट एक वेळ जागचा हलेल, पण हिरोजीच्या छातीचा कोट हटायचा नाहीं!

**मोरे :** (नोकरांस) चला रे, सारे एकदम या थेरड्यावर असे तुटून पडाल, कीं पहिल्या पळांत याचें डोकें तुटून पडेल! [ त्यांची झटापट होते. हिरोजी घाव लागून पडतो. माने घाई-घाईनें येतो. ]

**माने :** धनीसाहेब, तिकडे बांका वखत येऊन ठेपला आहे. सावध झालेल्या संभाजीनें बेफाम होऊन चार मुडदे जमीनदोस्त केले.

**मोरे :** अवल मुडदे होते म्हणून पडले! संभाजीनें उभे मुडदे आडवे केले असें कां सांगत नाहीं? चला, माने, आधीं तुळशीच्या देहाला डाग देण्याची व्यवस्था करा; [ नोकर तुळशीचें प्रेत नेतात. ] आणि मग खाशीं मोहऱ्याचीं माणसें बरोबर घेऊन येसूबाईला कब्ज करा. येसूबाई गवसली नाहीं तर तुमचे प्राण हरपतील हें खूप ध्यानांत धरा! जावळीच्या गवळवाड्यांतल्या गाईच्या दावणींत, येसूबाईला तिच्या वेणीच्या पेडानें खुंटाला बांधल्याखेरीज मोऱ्यांच्या वेचाळिशीला सद्गत लाभणार नाहीं! या थेरड्याला असाच पडूं देत!

[ मोरे, माने व नोकर जातात. ]

**हिरोजी :** साबाजी, धाव रे धाव! साबाजी, धाव! धाव!

[ साबाजी, मागाहून रायाजी, येसूबाई, शाहूमहाराज, चिटणीस वगैरे प्रवेश करितात. साबाजी हिरोजीला उचलून धरितो ]

**साबाजी :** साबाजीचा साडेतीन हात देह शाबूत असतांना हिरोजीच्या या प्राणाला धक्का कुणीं लाविला! हिरोजी, भिऊं नकोस! हिरू घास्तावल्यासारखा असा आंखलेल्या आंखांनीं माझ्याकडे कां पाहतोस? मी तुझा साऊ तुझ्या-जवळ आहें!

**हिरोजी :** (हसून) साऊ, वेडा, मीं स्वतांसाठीं का तुला आरोळी घातली? मासाहेब कुठें आहेत? आतांच मोऱ्यांनीं धाकट्या राजांना आणि मासाहेबांना— तला कोणत्या तोंडानें सांगूं?—साऊ, त्यांना या पावलीं गडावर घेऊन जा.

माझ्या आशेला आतां गुंतूं नकोस; जखम थेट जिवाला जाऊन भिडली आहे. राजांनीं मला पुन्हा सेवेसाठीं बोलाविलें आहे. ती पाहा, साऊ—तुला दिसायचीं नाहीत—मरत्या डोळ्यांना दुसरी दुनिया दिसायला लागते—दक्षिणच्या देवाचीं देवपावलें दिसताहेत—साऊ, राजांनीं विचारिलें तर मासाहेबांची खुशाली काय सांगूं ?

**साबाजी :** राजांना सांग, तुमची पुण्याई अढळ आहे; राजांच्या नांवाची द्वाही मिरवीत धाकटे राजे खुशाल रायगडावर निघून जातील !

**हिरोजी :** राजांचें नांव—भोळा भाव—सिद्दीस जाव ! [ मरतो. ]

**साबाजी :** देवास पाव ! ( उठून उभा राहतो. ) मासाहेब, फरजंद देवरूप झाले ! उजू हातांनीं राजांच्या रुजवातीला निघून गेले.

**येसूबाई :** अगबाई, हिरोजी काय हो केलेंत हें ? अशी कशी हो माझी फसवणूक केलीत ? तुमचा शेवटचा बोल अजून माझ्या कानापर्यंत आला नसेल, आणि साबाजी, इतक्यांत कसं हो यांनीं असें केलें ? सांगून सवरून प्राण जावा आणि उघड्या डोळ्यांनीं खेळ पाहावा तशांतली गत झाली ! राजांपरी राजांना फसविलें—यांनीं तर असा गळाच कापला ! सासरमाहेर एकदम पारखें झालें ! सटीसंकष्टीं केव्हांहि मागें पाहिलें म्हणजे फरजंद एखाद्या डोंगरासारखे उभे असायचे ! हिरोजी मला कोणाच्या हातीं निरवून गेलांत हो ? मला दटावणीनें बोलायला आतां कोणी आहे का ? रागानें बोलायचें ना एकदा आपल्या वेड्या मुलीला ? सासुरवासांत आपल्या देवसावलीनें माझें माहेरपण केलें आणि आज मला असें फसविलें ! हिरूबाबा, मी नाहीं जाऊं द्यायची तुम्हांला !

[ त्याच्या पायांवर मस्तक ठेवितात. ]

**साबाजी :** (स्वगत) ‘तरिच जन्मा यावें । दास ईश्वराचें व्हावें ॥’ माझ्या हिरूची पुण्याई साधुसंतांच्या पलीकडे गेली. ‘तरिच जन्मा यावं । ईश्वर ईश्वराचें व्हावें !’ धन्यांनीं पायांवर मस्तक ठेवावें तर सेवाधर्म ! वारे वा ! काय नुसता दंडासारखा पसरला आहे !

**येसूबाई :** ( निरखून ) अहो, पाहा हो, डोळ्यांची टक थोडी हलल्यासारखी वाटली; कसल्यातरी आशेंत जीव अजून गुंतून राहिला आहे हो.

**साबाजी :** आपली वेडी आशा भोळ्या डोळ्यांनीं पाहते ! हीं आशेचीं माणसें

नव्हत ! अशा कडव्या तब्बेतीच्या माणसांना आशेचें वावडें असतें ! राजांच्या दरबारीं फरजंदांना निराशेचा गांव जहागीर होता ! उठा, मासाहेब, आतां हिरोजीसाठीं रडायची वेळ नाहीं ! देवानें अगदीं योजून वेळ आणिली ! तिकडे राजांना मोऱ्यांनीं गिरफदार केलें ! इकडे पायरीचा चिरा निखळला, पण तिकडे मंदिराचा कळस ढळला ! आधीं कलत्या कळसाला हात दिला पाहिजे ! ताकदीनें, हिंमतीनें, हिकमतीनें शंभुराजे म्हणजे थोरल्या राजांना-सुद्धां भारी ! " बडे बापका सवाई बेटा " म्हणून ख्यात केली; पण आज दैवानें पलट खाल्ली ! आज सह्याद्रीचा सवाई सरजा सुताच्या सरकगांठींत सांपडला ! आधीं आशा लावून राजांनीं तोंडघशीं पाडिलें ! भरल्या ताटावरून उपाशीपोटीं उठणें आलें.

**येसूबाई :** साबाजी, अजून घटका उलटली नसेल, पण इतक्यांतच, राजांच्या वांचून दाही दिशा कशा सामसूम, सुनसाट दिसतात. जिकडे तिकडे अंधारल्या-सारखें होऊन दिनदुनिया दीनासारखी दिसूं लागली ! आपल्या नजरेंतील आग जगाला लागते; आपल्या जिवाची छाया सर्वांघटीं पसरते ! महाराज, सगळ्यांनाच कसें हो वैतागपद बांधायला लाविलेंत ! दिवसाढवळ्या ढगावांचून दिवसाचा देव दिसेनासा झाला, रात्रीच्या राजाची कळा हरपली !

[ पंच कल्याणी घोडा अबलख–लावणी ]

आडला रायगडीचा राणा । पडला आज शिपाईबाणा ।
ज्या राजवटी त्या रानवटी परि जाणा ।
जन अवघे उघडे, नाहीं ठावठिकाणा ॥ १ ॥
बारा मावळ एकच देना । चवदा ताल कोंकणी *रैना ॥
गगनांत झांकिती देवदेवता नैनां ।
रानांतहि प्याल्या शेंदुर राघु मैना ॥ २ ॥

**साबाजी :** ( स्वगत ) दगडावर शेंदूर थापून त्याला देवपणानें बोलायला लावण्याची हुकमत हरपून, आज स्वतांच शेंदूर पिऊन दगडासारखे व्हायचा वखत आला आहे !

**रायाजी :** ( स्वगत ) शिवांगी ! माझी गरीब शिवांगी माझ्याविणें अशीच

* रैंना = रात्र.

आगींत करपून निघत असेल! शिवांगी, शुभांगी, शिवगंगा! दिल्या मुदतीचा आज सरता दिवस! आजचा सूर्य मावळतांना माझ्या शिवांगीचे पंचप्राण आपल्या सोनेरी किरणांनीं बांधून नेईल; उद्यां उगवत उजळली तरी माझ्या नजरेला अंधाराच्या काळ्या राईंतच रखडावें लागेल!

**येसूबाई :** साबाजी, मी काय करूं हो? मला भोंवतीं रान पेटल्यासारखें वाटतें! मला सारखें भेदरल्यागत झालें आहे! माझ्या भित्या जिवाला कसा हो धीर देऊं?

**साबाजी :** आई, धीर धर; असें बोलून आम्हां मुलांना घाबरवूं नकोस. तूं आम्हां मराठ्यांची मायमाउली आहेस! आई, तूं असे हातपाय गाळलेस तर आम्हां उपाशीं बच्च्याकच्च्यांना—तुझ्या लाख लेकरांना भरल्या हातानें दूधभात कुणीं भरवायचा? आईवेगळ्या मराठी बाळांनीं आशेनें कुणाच्या तोंडाकडे बघायचें? आई, तुझ्या लग्नाचे साडे झाले त्या वेळीं मातोश्री सईबाईसाहेबांनीं, माझ्या मुलीच्या पावलांनीं सप्तशृंगीची देवी रायगडावर रहिवासाला आली असें म्हणून आम्हांला तोंडभर साखर चारली! तुझ्या आहेरासाठीं, सर्जेराजांनीं आम्हां मानकऱ्यांचा दरबार भरवला—शिवनेरीच्य त्या भवानीशंकराच्या भोळ्या दरबारांत आम्हां हुजऱ्यांचे सुद्धां मानकरी झाले—त्या दिवशीं—तुझ्या अंगाची लगीनहळद अजून पुरती निघाली नव्हती—तशा थाटांत विडासाखर वांटण्यासाठीं तुला हिंडतांना पाहून राजांनीं तुझें कौतुक केलें कीं, तुळजापूरच्या गाभाऱ्यांतल्या काळोख्या कोडमाऱ्याला कंटाळलेली श्रीभवानी आई आमची चढती दौलत नजरेनें न्याहाळण्यासाठीं भांडाराचीं भूषणं लेवून या दरबारांत चरणचाली मिरवीत आहे! ती वेळा आठवली म्हणजे आज ऊर भरून येतो. आम्हांला पोटाशीं धरून, डबडबलेल्या डोळ्यांतली ही आठवणीचीं आंसवें मायाममतेच्या पदरानें पुसून टाकण्याचा, आई, तुझ्यावांचून कोणाचा अधिकार आहे? सप्तशृंगीची देवी, भोंसले-शाहीची भवानी आई, महाराष्ट्राची महिषासुरमर्दिनी, दक्षिणची दुर्गेश्वरी, अशी आपल्या सिंहासनावरून उतरूं लागली तर आमचें दुर्घट कोण निवारील? आमच्याकडे पाहा; हिंमत सोडूं नकोस. आई, आम्हां सर्वांचा हा लाखाचा जीव देवानें तुझ्या ओटींत निरवला आहे त्याची जोपासना करायला

नको का ?

**येसूबाई :** साबाजी, हीं पाहा आलीं आंसवें पुन्हा गिळून टाकिली. राजांची राणी, सर्जेराजांची सून यापुढें तुमच्याकडे कोरड्या डोळ्यांनीं पाहील.

**साबाजी :** मासाहेब, अशा नजरेनें आपण पाहिलें म्हणजे या साबाजीची थकलेली काया वज्रांची होऊन, गेली गुजरी पुन्हा उभी करण्याची त्याला हिंमत येईल ! ऐशीं वर्षांच्या उमरींत गोगलगाईच्या पावलांनीं आलेलें म्हातारपण हरणटप्प्यांनीं माघारें पळालें ! आतां सेनासागर, तुम्ही असें करा—

**रायाजी :** अरे, मला कोणी प्रेमसागर कां म्हणत नाहीं ?

**साबाजी :** अगदीं अफाट वेडा माणूस ! कोणा माणसांवर काय प्रसंग आणि हा आपला—

**रायाजी :** साबाजी वेडा म्हणून हिणविल्यानें जातवेड जाईल का ? प्रेम प्रसंगाला जुमानीत नाहीं, माणसाला मानीत नाहीं ! प्रेमाच्या जगांत दोन जिवांपुरतीच जागा असते !

**साबाजी :** रायाजी, तूं मराठ्यांचा सेनासागर आहेस ना ? वडिलांनीं केवढी कीर्त करून ठेविली ! माझा तानाजी म्हणजे रणाचा रणशूर, मनाचा मनशूर, म्हणून स्वतः थोरल्या राजांनीं गुणांचे पवाडे गायले; सुभेदार मालुसऱ्यांनीं एकदा मनगटासारख्या मिश्यांना पीळ भरला म्हणजे मी, मी, म्हणणाऱ्या मर्दांनीं, पाहायला आणलेल्या पोरीची लाज उसनी घ्यावी ! हातीं घेतल्या कामाची थेट जीवाला पकड बसायची ! कोंढाण्यावर पट्ट्यानिशीं लढतांना, उदेभानानें हात उतरून टाकला तेव्हां देहापासून हात तुटला पण हातांतून पट्टा सुटला नाहीं ! आल्या प्रसंगाला पुढें पाऊल, माघार माहीत नाही ! त्यांचें नांव सांगून तें बुडवायला तुझ्यासारखा वेडापीर—

**रायाजी :** वेडापीर हें खरें ना ? मग अशा बोलांनीं वेड्याला कां मारितां ? प्रेमापुढें कीर्तीचा पवाड नाहीं, नांवाची चाड नाहीं ! राखेच्या ढिगांतून अंगार भडकविण्यासाठीं फुंकर मारला तर डोळ्यांत राख उडेल एवढाच काय तो लाभ ! साबाजी, तरण्या दिलाची आग कुणाला सांगून कळत नाहीं. मी काय करूं हो ? माझ्या मनाची उच्चलच मेली आहे. तुमचा दौलतराव प्रेमाचा

शेवट झाला म्हणून मेला; हा रायाजी प्रेमाचा उगम गवसत नाहीं म्हणून मेल्यासारखा झाला आहे. दर्यासागर तसा मेला, सेनासागर असा मेला !

**साबाजी :** नादान मुला, मालुसऱ्यांच्या घराण्यांत जन्माला येऊन, आल्या कामाला अशी कुचराई करितोस ! तुम्हां मालुसऱ्यांचा कुळधर्म मोटा कठीण आहे ! लहानपणीं, तुझ्या लगीनमुहूर्तावर सर्जेराजांचें प्रमाण ऐकतांच, तुला बांधल्या बाशिंगानें बोहल्यावर टाकून देऊन, उदेभानाच्या बाटग्या कऱ्यारीशीं निका लावण्यासाठीं, सुभेदार उसन्या घाईनें कोंढाण्याच्या बोहल्यावर चढून गेले ! सर्जेराजांनीं त्यांचा दिवस केला तेव्हां दुखवट्याचें पागोटें तुझ्या डोकीला बांधून, त्याच हातांनीं तानाजीबावांची ही तलवार—सुभेदारांची ही राजेश्वरी तुझ्या कमरेला बांधिली; त्या वेळीं शंभुराजांच्या पावलावर पाऊल टाकण्याची भाक देऊन, बापाच्या नांवानें क्रिया केलीस; आणि आज राजांना मोऱ्यांनीं ठाणबंद केलें असून, तूं असा मोकाट सुटला आहेस ! तुझ्याकडे पाहून, वरच्या दरबारांत, सुभेदारांचा सिंहाचा जबडा चिमणीसारखा झाला असेल ! अरेरे, क्रियानष्टा, देवकळा दवडून दगड होण्याची ही हौस तुला कुठून आठवली ? बिरवाडीच्या बहाद्दराच्या बीजाला बाट लाविलास तर उद्यां तुझ्या नांवानें बायकापोरी कीं रे बोटें मोडतील ! सारा जनलोक तोंडावर थुंकेल !

**रायाजी :** साऊबाबा, उगीच शीण करून घेऊं नकोस; तुझ्या हुकुमाची तामिल करण्यांत माझ्याकडून समजून कसूर होणार नाहीं; प्रेमाचें वेडें पाऊल कुठें चळलें तर मात्र मला माफी कर. सांग मी काय करूं तें !

**साबाजी :** शाबास, हें बोललास एवढ्यानेंच मराठेशाहीला मूठभर मांस चढलें ! चल, आधीं आपल्या उधळलेल्या लोकांची जमात कर; अजून राजांना घेऊन मोरे निघाले नसतील त्यांना पायबंद घाल. म्हापशाच्या राण्यांना सत्तरी महाल धुंडाळून आपली बाजू बांधायला सांग. तुझ्या हातीं लागण्यापूर्वी मोरे मोगलांना मिळालेच तर, बादशहाच्या छावणींत बेगमसाहेबांची भेट घेण्यासाठीं मी तुळापुरीं जाऊन बसतों. राजे सुटले तर अजून एक हात ब्रह्मांडाला कव घालता येईल. चल, सुटल्या तीराच्या तडफेनें धाव घे; वेळेला आतां मोल नाहीं. माझा म्हाताऱ्याचा तुला आशीर्वाद आहे.

**रायाजी :** आई भवानी काय अब्रू राखील ती खरी.

[ येसूबाईस मुजरा करून जातो ]

**साबाजी :** एक झालें; मासाहेब, आपण धाकट्या धन्यांना घेऊन रायगडच्या रस्त्याला लागावें. आपल्या दिमतीला द्यायला या चिटणिसाखेरीज आज दुसरें कोणीहि नाहीं. चिटणीस, आज वेळ येऊन ठेपली आहे; खंडोबा, हें जिवाचें जोखीम तुला गडावर न्यायचें आहे. मराठेशाहीच्या सौभाग्याची ही केशरकस्तुरी जपून रायगडच्या करंड्यांत नेऊन ठेवण्याचें काम तुझ्याकडे आहे; तिच्या कुंकवाचा टिळा आणण्यासाठीं मी तुळापुरीं जातो. मासाहेब, आपला निरोप घेऊन म्हणून मी जाणार आहें, बेगमसाहेबांना खूण पटण्यासाठीं आपला कुंकवाचा करंडा तेवढा मजजवळ देऊन ठेवा. चिटणीस, राजांच्या घरची अब्रू बरोबर घेऊन निघाला आहेस. तुला काय सांगूं? [ त्याला जवळ घेऊन व त्याचा हात हातांत घेऊन ] अरेरे, भवानीश्वरा ! कोण्या दैवाचा दिवस दाखविलास हा ! मोहऱ्यांसारखे मोहरे हरपून आज मराठेशाहीची अब्रू या एवढ्याशा मुलाच्या बाळमुठींत ठेवावी लागत आहे. बाळ, मोऱ्यांचीं माणसें तुमच्या मागावर आलीं तर आल्या अडचणींतून, आपली ही एकवटलेली पुण्याई, मूर्तिमंत मराठेशाही, अब्रूनिशीं निभावून नेण्यासाठीं बृहस्पतीच्या बुद्धीनें आणि बारा हत्तींच्या बळानें नेहमीं सावध राहा ! बाळ, मरता काळ ओढवला तरी विसरूं नकोस कीं, तुला बाळाजीबाबांचें नांव लावायचें आहे आणि बाजी देशपांड्यांची जात सांगायची आहे. कायस्थाच्या इमानापासून चळूं नकोस.

**चिटणीस :** झांकली मूठ सवा लाखाची; बोलून काय दाखवायचें ! साउबाबा, मोऱ्याच्या माणसांना आमचा माग लागूं नये म्हणून, या श्रीभवानीचें उमटतें पाऊल धुऊन टाकण्यासाठीं, माझ्या रक्ताचें शिंपणें करीन; माझ्याबद्दल तुम्ही निर्धास्त असा.

**साबाजी :** मासाहेब, तोंडांतून बोल निघत नाहीं, पण आतां निरोप घ्यायचा ! काळ येऊं नये तो आला—निभावून नेणार श्रीउमामहेश्वर समर्थ आहेत. पुण्याई सबळ असली तर साबाजी पुन्हा सेवेला चरणाशीं येईल; नाहींपेक्षां हीच अखेर भेट ! मासाहेब, इतका वेळ अवसानानें बोललों, पण आतां उरीं

फुटण्याची वेळ आली. मीं आपल्याला माझ्या वडिलकीनें धीर दिला; पण आतां मला धीर कोण देणार? शिरक्यांच्या या कुळदैवताच्या पायांची पुण्याई!--माझ्या बाळराजांची देवमूर्ति (शाहूमहाराजांना साष्टांग नमस्कार घालतो.) रायगडच्या देवा, या दुबळ्या देहाला आशीर्वाद द्या--या पायाच्या चाकरीची आठवण ठेवा--चुकल्या कामाची--उण्याअधिकाची साबाजीला माफी करा!

[ येसूबाई त्याला उठवितात. ]

**येसूबाई :** मामासाहेब, हें काय बरें असें भलतेंच? आजोबाला मांडीवर खेळवून नातवाच्या पायां पडायचें? ऐशीं वर्षांची तपश्चर्या करून आठ वर्षांच्या बाळाच्या पायांवर मस्तक ठेवायचें? बाळ, आजोबांच्या पायांवर डोकें ठेवून त्यांचा आशीर्वाद माग!

**साबाजी :** ऐशीं वर्षें आणि आठ वर्षें! आई, उमर फत्तराला असते, फुलाला नसते. फुलाची नुसती जःत पाहायची असते. माझा म्हाताऱ्याचा बोल आपला ऐकून ठेव—तुझ्या पोटीं हा सर्जेराजांनीं नवा अवतार घेतला आहे. देवाघरचा जीव जपून ठेवायचा आहे. बरें, मासाहेब, वेळेनें वेळ वाढते. देवाचें नांव घेऊन शुभलक्षणीं पाऊल पुढें टाकायचें!

**येसूबाई :** आबासाहेबांच्या नांवाखेरीज दुसरें कोणत्या देवाचें नांव घ्यायचें! आबासाहेब, आपल्या कुळीच्या कुळदीपकाला-आपल्या नांवकऱ्याला नीटपणें घरीं न्यायचें आपल्याकडेच आहे!

[ एकव्यारे मल्हारा यांवाचुनी—लावणी. ]

निघते घेउनि तुमच्या नावा।
देवा शिवनेरीच्या शिवा॥
जरि करि सोबत भ्याल्या जिवा।
पदराखालीं चिमुकला दिवा॥
झड घाली तरी कसा वारा उजवा-डावा।
घ्या सांभाळुनि; हा न्या आशेच्या गांवा॥

मामासाहेब, [ हिरोजीच्या प्रेताच्या व साबाजीच्या पायां पडते. ] येऊं आतां? लौकर पाय दाखवायचे; वडिलांच्या छत्रावांचून उघड्यासारखें वाटेल! राजांना सांभाळा—स्वभाव थोडा—[ रडतात. ]

**साबाजी :** मुली, अखंड वज्रचुडेमंडित हो! ( येसूबाई वगैरे सर्व जातात. ) झालें दगडाच्या दिलानें इतका वेळ धीर धरला आणि आल्या प्रसंगाशीं टक्कर दिली! सारीं कामें निरवली; आतां हिरोजी, तुझ्यासाठीं रडायचें तेवढें राहिलें [ हिराजीच्या प्रेताकडे पाहतो. ] संसारांतल्या सफरींतला सच्चा सोबती—दिलाचा दोस्त—जिवाचा जोडीदार—( एकदम त्याला मिठी मारून आक्रोशानें ) हिरोजी, हिरू, वचन दिलेंस काय आणि हें केलेंस काय? खांद्याला खांदा भिडवून लढलों, गळ्यांत गळा घालून रडलों, हातांत हात घालून देवलोकीं चढलों, असें दोघांनीं हसत राजांना सांगायचें. एका आईच्या पोटीं जन्म मिळाला नाहीं तरी धरित्री मातेच्या उदरीं एकठाय मरण मिळवायचें असें हातावर हात मारून वचन दिलेंस आणि आज असा बेमान होऊन हातोहात निघून गेलास! राजांनीं नेहमीं नांवाजणी करावी, कीं माझा हिरूबाबा जिभेचा सच्चा, हिरूबाबा जिभेचा सच्चा म्हणून! पण आबासाहेब, तुमच्या लाडक्या फरजंदांनीं आपल्या जीवाच्या सवंगड्याशीं अखेर अशी दगलबाजी केली! मला एकट्याला मागे लोटून, आपल्या चाकरीच्या लोभानें हिरोजी आपलपोटीपणानें निघून गेले! हिरू, आजवर जगाकडे चार डोळ्यांनीं पाहिलें, आज या माझ्या दोनच डोळ्यांना इकडे तिकडे पाहण्याची भीति वाटते. तुझ्याकडे पाहतांना तर ऊर दडपून जातो आहे! हिरू, राजांच्या पायांची तुला आण आहे, एकदा तरी डोळे उघडून पाहा रे! अरेरे! हिरकणी, तुझ्या रक्ताला माती कीं रे लागली ही! त्या मातीमोल मोऱ्यांनीं असा हिऱ्यासारखा हिरा मातीला मिळविला! शंभुराजे, तुम्हीं राजधर्म सोडला त्याचीं अशीं फळें मिळालीं; जीवाची जोड नसल्यामुळें हातापायांची पुण्याई नुसती धडपडीसारखी दिसते. मूळ पायाशुद्ध नसल्यावर विस्ताराचा पसारा फळाला येत नाहीं. बचनागाच्या बनांतून निघालेली गंगा बारामुलख विखारीत जाळींत जाते! शंभुराजे, शंभुराजे, कडू बोलांची माफी करा—पण, तुमच्या राजवटीं हिरोजी अशा हलक्या मरणानें मेला! हिरू, काय करूं रे, शंभुदेवाला सोडविण्यासाठीं मला जायचें आहे! माझा हात रिकामा असता तर तुझ्याबद्दलचा सूड पुरतेपणीं घेतला असता! मोऱ्यांच्या मागच्या बेचाळिशीचे गाडलेले मुडदे उकरून. त्यांच्या हाडांच्या हिरक्यांनीं तुझें सरण

रचिलें असतें; आजच्या मोऱ्यांच्या हाडांचीं काडें काढून तुझी तिरडी तयार केली असती; मोऱ्यांच्या पुढच्या बेचाळिशीच्या कोंवळ्या नाळवारांनीं तुझ्या ताटीसाठीं नाड्या केल्या असत्या; या मोऱ्यांचें मुंडकें छाटून त्याची रक्ताळलेली शिंकाळी या हातांत घेऊन, राजांच्या नांवानें गर्जतगाजत तुझ्या देहाच्या मिरवणुकीपुढे त्रिखंड नाचत सुटलो असतों ! पण हिरोजी, माझा हात संभाजी महाराजांच्या मुजऱ्यांत गुंतला आहे. आपण रायगडच्या रियासतीचीं माणसें; आपल्या देहावर दौलतीचीसत्ता आहे ! एवढ्यासाठींच तूं आपल्या सोबत्याला मागे टाकून देह सार्थकीं लावलास ! राजांना सोडविण्यासाटीं मलासुद्धां इतक्या तांतडीनें जायचें आहे कीं तुझ्या तोंडांत असें तोंड घालून, मोकळ्या मनानें रडण्याचें भाग्य, हिरा, माझ्या कपाळीं नाही. हिरूबाळा, रागावूं नकोस; तुझ्या तोंडावरचें रक्त पुसून टाकून मग जाऊं म्हणतोस ? देवा, तुमची दुनियादारी परोपरीची आहे ! आजवर, पित्या बाळाचा मुका घेतल्यामुळे आईच्या ओठाला तिचें दूध लागलें असेल; तरुणाचे ओठ तरुणीच्या चुंबनानें प्रेमाच्या कल्पनेमुळें अमृतानें न्हाऊन निघाले असतील; पण अशा म्हातारड्या मुक्यानें; आपल्या जिव्हाळ्याच्या रक्तानें आपले ओठ अजून कुणीं रंगविले नसतील ! (*त्याचा मुका घेतो.*) हिरकणी, हीच आपल्या स्नेहाची शेवटची सेवा! तुझ्या मूठमातीची काळजी मी कशाला करीत बसूं ? सार्थकीं लागलेल्या जीवाची उत्तरक्रिया देवांना करावी लागते. देवांच्या तेहतीस कोटी तुझ्या देहाच्या दिमतीला, जोडल्या हातीं उभ्या राहतील ! भाई, आतां मला निरोप द्या ! जीवाच्या जीवासाठींसुद्धां चाकरीला चोर होतां येत नाही. हिरोजी, साबाजी शंभुराजांच्या सोडवणुकीसाठीं निघाला ! पण आज मला तुझ्या धीराचा पाठिंबा नाही. हिरा, देवाच्या दरबारांत, तुम्हां जिवाशिवांच्या गांठी पडल्यावर, राजांजवळ भीड घालून त्यांना सांग, साबाजी अगदीं थकला, उतारवय झालें– आतां ही दगदग होत नाहीं; त्याला लोकर सोडवून घ्या ! हिरू, आतां पुन्हा भेट राजांच्या समोर ! हिरकणी, वरच्या वाटेनें जपून जा; वाटेंत तुला तुझ्या साऊची आतां सोबत नाही ! आतां ही एवढी एक –एक–एकच अखेरमिठी– आणि संबंध तुटला ! ( *उठून उभा राहात*) संपला स्नेहाचा संसार ! फरजंद ! नोकरी पेशांतल्या साबाजी शिरक्यांचा, तुमच्या वीर देहाला हा शेवटचा

रामराम!

[ त्याच्या पायांवर डोकें ठेवतो. पडदा पडतो. ]

## प्रवेश दुसरा

[ स्थळः—घाटमाथ्यावरील रस्ता. चिटणीस व रायाजी प्रवेश करितात. ]

**चिटणीस :** अरेरे, दैवाची दिशाभूल झाली म्हणजे अशी फसगत होते.

**रायाजी :** मोऱ्यांनीं पल्लेदार मजला मारून राजांना तुळापुरीं बादशाही छावणींत नेऊन गुदरलें; मीं माझ्याकडून कांहीं कसूर केली नाहीं.

**चिटणीस :** सेनासागर, तुम्ही मोठीं माणसें; मन स्थावर नसलें तरी तुमच्या हातून भाग्याची करणीच होते. गंगा गढूळली म्हणजे समुद्र सोडून कांहीं डबक्यांत जाऊन जीव देत नाहीं. बरें पुढें काय ? साबाजींनीं तुम्हांला माघार घ्यायला सांगितलें ?

**रायाजी :** मोऱ्यांनीं मान्यांना पाठविलें इकडे धाकट्या राजांना आणि मा-साहेबांना धरण्यासाठीं–तेव्हां माणसाला माणूस वाढावें म्हणून साबाजींनी मला इकडे पाठविलें आणि बेगमसाहेबांच्या भेटीसाठीं आपण तुळापुराकडे गेले.

**चिटणीस :** सेनासागर, आतां मान्यांचा मारा चुकविणें मुष्किलीचें झालें आहे. माझ्या बाळबुद्धीचा बेत तुमच्या मनास येईल का ?

**रायाजी :** खंडोबा, तुला बाळबुद्धीचा कोण म्हणेल ? मोठमोठ्या पंडितांशीं, मांडीला मांडी लावून, बरोबरीनें बोलत बसण्याची तुझी लायकी आहे. काय तुझा बेत आहे सांग पाहूं.

**चिटणीस :** आपण असे एकमेळीं निघालों तर वेळेवर एक घाव दोन तुकडे व्हायचे; म्हणून माझा मनसुबा असा आहे कीं, आपण फुटून रायगडाकडे दोन वाटांनीं जावें; तुम्ही मासाहेबांना घेऊन तळकोंकणांतून चला; मी धाकट्या राजांच्या संगतीं वाईदेशावरून येतों. अशानें भीति दुभावून

मृत्यूचें निदान अपमृत्यूवर तरी भागेल.

**रायाजी :** तुझा सल्ला पोक्तपणाचा आहे.

**चिटणीस :** चला तर मग. याच पावली मासाहेबांना हें कळवून मार्गाला लागूं.

[ दोघेहि जातात. पडदा पडतो. ]

## प्रवेश तिसरा

[ स्थळः—तुळापूर; बादशाही छावणी. बेगमसाहेबांचा शामियाना. जाळीदार पडद्यामागे बेगमसाहेब, दासी, पुढें साबाजी. ]

**साबाजी :** मी साबाजी शिरके बेगमसाहेबांच्या पायभेटीसाठीं आलों आहें.

**बेगम :** उठा, आमच्या येसूबाईसाहेब तुम्हाला वडीलपणानें लेखतात. साबाजी, ताईसाहेबांनीं या गरीब बहिणीची आठवण कां केली ?

**साबाजी :** हुजूर, ऐकावा त्यांचा निरोप. घरधनी आपल्या वडिलांच्या अटकेंत गुंतले आहेत; घरांत कर्तेपणानें बघायला कोणी नाही; आणि या करंड्यांतलें कुंकू वाढवायची वेळ आली आहे; तेव्हां आईसाहेबांनीं हा करंडा आपल्याकडून भरून-कुंकवानें भरून-मागितला आहे. हुजूर जाणतच आहेत कीं, हिंदूंच्या बायकांना कुंकू हेच सौभाग्याचें लेणें आहे.

**बेगम :** हुशार हेजीब आपली अडचण माझ्या लक्षांत आली; पण हा नाइलाजाचा कम्‌बखत आहे. आमच्या घरीं कुंकूं लाभण्याची आशा नाहीं; पाक दीनाचे मुसलमीन काळा अबीर बुक्का वापरतात.

**साबाजी :** मासाहेबांना आपली मोठी आशा आहे; निदान मला राजांशीं बोलायला मिळालें तर मी राजांच्या तोंडचीं चार सोन्याचीं अक्षरें मासाहेबांना ऐकण्यासाठीं घेऊन जाईन.

**बेगम :** ठीक आहे; पाठवा तो करंडा इकडे.

[ दासीबरोबर साबाजी करंडा पाठवितो. ]

**साबाजी :** [ स्वगत ] आई अंबाबाई, या वेळीं तूं बेगमसाहेबांच्या मनींमुखीं

उभी रहा; या अवकाळीं करुणेचा विस्तार केला नाहींस तर माझ्या आशेचा सारा गांव ओसाड पडेल.

[ दासी करंडा परत आणून देते; साबाजी तो उघडून पाहतो. ]

**साबाजी :** साहेबा, हा तर खुद्द बादशाही शिक्क्याचा मोहरबंद परवाना आहे.

**बेगम :** हो; हा परवाना जवळ असल्यावर तुम्हांला बुरखा पांघरूनसुद्धां वाटेल तिथें, वाटेल त्या वेळीं वावरायला कोणाची अटक नाहीं.

**साबाजी :** पण यानें बेगमसाहेबांच्या जीवाला कांही त्रास होणार नाहीं ना ?

**बेगम :** या देहांतल्या रक्ताची लाली, मराठ्यांच्या महाराणीच्या मेहेरनजरेनेंच पाक राहिली आहे; साबाजी, ताईसाहेबांना बेफिकीर सांगा कीं, यामुळे प्रसंग ओढवलाच तर मुसल्मानांच्या अबीराचें हिंदूकरितां लाल कुंकू करण्यासाठीं, बेगमसाहेबा तें आपलें रक्त शिंपडायला तयार आहे. ताईसाहेबांना फारफार विचारलें म्हणून सांगा--धाकट्या शिवाजीराजांना माझा आशीर्वाद सांगा !

[ साबाजी कुर्निसात करितो; पडदा पडतो. ]

## प्रवेश चवथा

[ स्थळः—घांटमाथ्यावरील आंबराई. रायाजी प्रवेश करितो. ]

**रायाजी :** ( स्वगत ) आतां अगदीं अखेर, अखेर होण्याची वेळ आली ! इच्छा बळावलेली आणि इलाज अगदीं पांगळा, अशी अवकळा जिवाला वेड लाविते. अधिऱ्या मनाला विरंगुळा पडावा म्हणून माथ्यावर कामगिरी घेऊन पाहिली, पण अनुभवानें उलट्या गोष्टी सांगितल्या. आज जिवाची बेचैनी बेहद्द वाढली आहे. बेकार बसा वा कारस्थानांत असा--प्रेमाच्या पेचांतून जीव कांहीं सुटत नाहीं. शिवगंगा, शुभांगी, शिवांगी ! प्यारी, आंतल्या आंत तळमळ होऊन कांहीं सुचेनासें झालें आहे. एक विचार, एक अनुभव जीवाभोंवतीं घिरट्या घालून त्याला एकलेपणानें राहायला लावितो आणि

दुसऱ्या गोष्टींना जवळ येऊं देत नाहीं. धडपडत्या मनानें सारखा विचार करूनहि, काय करावें याचा धागा लागत नाही. जिवा, जाऊं देत! दगडा-प्रमाणें जडावलेल्या डोक्याला घडीभर या दगडाच्या जातीची सोबत द्यावी म्हणजे झालें! शिवांगी, शुभांगी, शिवगंगा! नुसती तळमळ, आग चालली आहे!

[ दगडावर डोकें ठेवून पडतो, एका बाजूनें शिवांगी येते. ]

**शिवांगी :** ( स्वगत )

[ चाल–कुठवर पाहूं वाट माथ्यावर चंद्र–लावणी. ]

आजवरि पाहुनि वाट सुंदरा देह किरे झुरला । जिवलगा रे ॥
डोळ्यांत प्राण बघ उरला ॥
भरास आला खेळ–जाब हा कोणि तरी उकला ॥
माझाच डाव कां हुकला ॥
पुरती झाली सांज, कळप हा विसांवत बसला ॥
तो कीर ♣ कुणिकडे फसला ॥
घरिं घरिं चाले थाट देवावर फुलवरा चढला ।
हा एक हार कां पडला ॥
बहरुनि आला बाग, चहुंकडे रंगरस झुकला ।
माझाच मोगरा सुकला ॥
( चाल ) कां पाडिसि देवा, वज्रचुड्याला तडा ।
कुणिकडे उडाला मुद्रिकेतला खडा ।
हरपला मणिच मग उदास नागिणफडा ।
धरुनि भरवसा जीव ज्यावरति आजवर ठरला ।
जिवलगा रे तो आज वायदा सरला ॥ १ ॥

राया, राजसा, हट्ट, हट्ट तरी किती करायचा? हा मुलखाविरहित रुसवा कधीं बरें सरायचा? राया, केलीस ती छळणा पुरेशी नाहीं का रे झाली? बायकांचा वेडा विश्वास; भोळ्या जीवानें दोन्ही डोळ्यांनीं

♣ कीर = पोपट

पांखरासारखी भिरमिर वाट पाहिली; दिल्या मुदतीची पांच वर्षें–राया रे, एकेका प्राणानें एकेक वर्ष मोजलें; आज मुदत ढळून पांचवा दिवस! दिवसा-दिवसाच्या श्वासानें प्राणामागून प्राण पळून, कठोरा, तुझ्या शिवांगीची आशा आज मरणार रे! वेड्या जीवाला नादी लावलेंस; तुझ्या नांवासाठीं चारचौघांत बदनाम झालें, रानारानांतल्या राघूमैनांना तुझ्या नांवाची पढवणूक देत आलें; दगडादगडाला तुझा ठाव विचारला, फुलाफुलाला तुझा गांव विचारला! कांट्याकुट्यांतून देहाची चाळण करून, तुझ्या पायधुळींत प्राणांची पेरणी करीत तुझ्यामागें देशोधडी केली! आला दिवस गेला आन् जीव भरंवशावर मेला? राया, अशी वंचना कां रे केलीस? अमृताच्या आळ्यांत वाढविलेल्या वेलीला विषाचीं कीं रे फळें आणिलीस! राया, धाव धाव! तुझ्याविना मी परदेशी झालें रे! प्रेमानें पाहूं नकोस, रागानें पाहा–पण पुढें उभा राहा! तुझ्या पावलांची उमटली साक्षी राखण्यासाटी कुडीची छाया धरीन; तुझ्या नजरेच्या मोहनीवरून जीवाची कुरवंडी करीन! सख्या, जीवाचा धीर सुटला! ( मोठ्यानें ) राया, राया, माझें भान सांडलें! राया, आतां संभाळ रे संभाळ! राया, राया, तुला कोणत्या डोळ्यांनीं पाहूं–तुला कोणत्या बोलांनीं बाहूं? राया, संभाळ आतां! [ ती बेभान पडूं लागते; रायाजी दचकून उठून तिला सांवरून धरितो. ]

**रायाजी :** कोण, माझी शिवांगी–माझी शिवगंगा?

**शिवांगी :** ( खालीं पाहून ) तुझी–तुझी–साता जन्मांची तुझी शिवगंगा! ( त्याच्याकडे निरखून पाहात ) राया–जिवलगा, ( एकदम जोरानें त्याला मिठी मारून ) निष्ठुरा, इतके दिवस कुठें रे होतास? मला सांवरून धर! नाहीं तर वेड्या आनंदानें ऊर कोंडून मी मरून जाईन! मला टाकून जाऊं नकोस रे!

**रायाजी :** ( स्वगत ) अहाहा! आनंदाचें आऊर*लोटलें! आकाशांतून अमृताची झरणी लागून, काया कांटेफुलांनीं डंवरून निघाली! चौऱ्यांशीं लक्ष जन्मांची तपश्चर्या फळाला आली! पुंडलीका भेटी परब्रह्म आले गा! माझी शिवांगी–साता जन्मांची माझी शिवगंगा, तानाजीबाबांच्या पुण्याईनें

---

* आऊर = पूर.

पुन्हा पाहिली! बाबा, बाळपणीं माझ्या लग्नांत भाग्याचें विघ्न आल्यानें, सुनमुख पाहण्याची तुमची हौस पुरली नाहीं म्हणून सर्जेराजांनासुद्धां खंत वाटत होती. बाबा, आज दोघेजण मिळून, आम्हां बाळांवर अमृताचा अभिषेक धरा, नक्षत्रांच्या अक्षता उधळा आणि आनंदी आंसवांचा आहेर करा! बाबा, आपल्या सुनेला डोळे भरून पाहून, तिला आपला आशीर्वाद द्या! (उघड) शिवांगी, माझ्या बाबांच्या आंसवांच्या पावसांत आपण अशीच अखेरपर्यंत उभीं राहूं!

**शिवांगी :** राया, आतां मला टाकून जाणार नाहीस ना रे?

**रायाजी :** आतां तुला टाकून जाणें? माझा प्राण गेला तर प्राणेश्वरी, माझा मुडदा अशा मगरमिठीनें तुझ्या सेवेला सादर राहील!

[ नोकर धावत येतो. ]

**नोकर :** सेनासागर घात झाला! मान्यांनीं आंबराईला चौफेर घेरा घातला! आतां मासाहेबांचें कसें होणार? सेनासागर, कसे हो असे आळसांत फसलांत? मान्यांनीं अगदीं मोका साधिला!

**रायाजी :** मान्यांनीं अगदीं दुस्मानदावा साधला! जा, मामासाहेबांना इकडे घेऊन ये.

**नोकर :** मामासाहेबांना इकडे घेऊन येऊं? त्यांना कोणत्या जिभेनें असें—

**रायाजी :** तुला काय त्याचें! हुकमाच्या ताबेदाराला स्वतःची जीभ नसते. जा! [ नोकर जातो.

**रायाजी :** (स्वगत) वडील माणसांचा उपमर्द झाला तरी फिकीर नाहीं, पण आतां माझ्या शिवांगीच्या या मिठींतून माझी सुटका-सुटका-माझी सुटका-पण मासाहेबांची सुटका मग कशी करायची आणि कुणी करायची? मासाहेबांच्या अब्रूला धक्का लागण्याची-मराठेशाहीच्या इज्जतीवर आकाश कोसळण्याची वेळ आली असतांही मी जर अशा मोहाच्या मिठींत मग्न राहिलों तर-तर..., तर दुभंगलेल्या आभाळाच्या फटींतून थोरले राजे धडधडणाऱ्या छातीनें माझ्यावर आशाळभूत-दैन्यवाणी आशाळभूत नजर टाकतील-मला प्रेमाच्या अशा मगरमिठींत गवसलेला पाहून, सर्जेराजे उसासा टाकून माझ्या बाबांच्याकडे पाहतील—

या कुलांगाराच्या लाजिरवाण्या करणीनें ओशाळून बाबा मान खालीं करतील? सुभेदारांचा सिंहासारखा जबडा चिमणीसारखा होईल! उद्यां वर गेल्यावर, सुभेदार सुनमुख पाहण्याचा कंटाळा करतील! नाहीं, मला ही मिठी सोडविलीच पाहिजे. मासाहेबांची सुटका–पण ती कशी करायची? बरोबर वीस तरी माणसें असतीं तर या रायाजीनें–या राजेश्वरीच्या रणरंगानें मान्यांच्या हजारांशीं हिंमतीनें हुजत घातली असती! काय करावें? कशा रीतीनें मासाहेबांना बाहेर न्यावें? दुसऱ्या एखाद्या वेषानें मासाहेबांना—कीं, मासाहेबांच्या वेषानें दुसऱ्या एखादीलाच मान्यांच्या हातीं देऊन–हो मान्यांनीं अजून मासाहेबांना कधींच बघितलेलें नाहीं–सोन्याच्या साखळ्या जिच्या पायांत दिसतील तिलाच माने ऐकिवानें मासाहेब म्हणतील–पण अशी बाई-सुद्धां कोणी नाहीं; कोणाच्या जीवावर असा उदार होऊं? या रायाजीच्या रासवटी जीवाचा या वेळीं काय उपयोग? मग या माझ्या नाजुक जीवावर–( तिला एकदम जोराची मिठी मारून ) अरेरे, माझी दीनदुबळी, कमनशीब शिवांगी! मालुसऱ्यांचा कुळकर्म मोठा कठीण आहे. या माझ्या नाजूक जीवावर-या प्रेमाच्या पंचप्राणांवर पाणी सोडलेंच पाहिजे!

**शिवांगी :** राया, ही असली मिठी! राया, तुझ्या मनांत कांहीं तरी पाप आलें! तूं असा मुखजड कां? अशा वेळीं तोंडाला येईल तें सारखा बोलत राहा. तुला वाटेल तें बोल— अगदीं वेड्यासारखें बोल! पण कांहींतरी बोल! मला आनंदाच्या उकळ्या फुटून येताहेत; तुझ्या बोलण्याकडे लक्ष लावण्यासाठीं धडपडणें उरलें नाहीं तर हा जीव आनंदाच्या गुंगींत बुडून मी मरून जाईन! राया, मनांत असेल तें बोल–मनांत नसेल तें बोल! वेड्या, किती परोपरीनें तुला आळवायचें बरें? राया, राया–बोल ना रे राया! असें काय बरें?

“ बोल मेरे राजारे नैनू अब मोसे बोल।
चाहे पिया जान । चाहे पिया रैन ।
दिलकी बाते बोल ॥ ध्रु० ॥
कबसे मैं थाडी थाडी, रहां तकत हूं ।
कबसे मैं थाडी तोपे अरज करेत ।
मुखसे मीठे बोल । बोल मेरे ॥ १ ॥

बोलणार ना? ही मी अशी ऐकत राहतें बरें? [ त्याच्या खांद्यावर मान ठेविते.]

**रायाजी :** ( स्वगत ) जिभेवरचा बोल ओठांवर मरतो–डोळ्यांतला बोल आंसवांनीं झरतो! सुभेदार तानाजी मालुसरे, उदेभानानें हात कलम केला तेव्हां देहापासून हात तुटला, पण हातापासून पट्टा सुटला नाहीं! त्या तुमच्या पट्ट्याची करारी कुवत, आज आपल्या रायाच्या जिभेच्या पट्ट्याला द्या! बोला, सेनासागर, कमरेच्या राजेश्वरीची जीभ करून तिनें बोला!

**शिवांगी :** बोल, राया, बोल रे, जीवाच्या राया, बोलाबोलानें मला बेभान करून टाक!

**रायाजी :** ( स्वगत ) साऊबाबा, देवकळा दवडून दगड होऊं नकोस म्हणून सांगितलेस; पण आतां दगड होऊन अंगीं देवकळा आणायला नको का?

**शिवांगी :** नाहीं बोलत तूं? हट्टी राया, तुझ्या मनांत मग, मीं मरावें असें का आहे?

**रायाजी :** हो!

**शिवांगी :** वेड्या, मग हें बोलायला का भ्यालास? राया, माझ्या शिपायासाठीं जिवाचें रान करायला शिवांगीनें नाहीं कधीं म्हटलें? तुझ्यासाठीं जगायचें–तुझ्यासाठीं मरायचें! माझा राया अगदीं अगदीं वेडा आहे.

[ त्याला मिठी मारावयास जाते; तो थांबवून तिचे हात धरितो. ]

**रायाजी :** शिवांगी, थांब; तुझा शिपाई तुला वाटतो तितका गरीब नाहीं; तुझा राया एखादा बेजबाबदार शिपाईप्यादा नाहीं!

**शिवांगी :** राया, राजेश्वरा, तुला गरीब कोण म्हणेल? कुबेरभांडाराची सारी सारी संपदा माझ्या रायाच्या नांवावरून ओवाळून टाकावी! माझ्या सांवळ्यासुरतीचा सरदार, माझ्या ऐन अमदानीचा अमीर, माझ्या उमलत्या उमेदीचा उमराव, या नव्या नवतीचा नवरंग, माझ्या बढत्या बहारीचा बादशहा–तूं गरीब? शिवांगीच्या शिलेदाराला गरीब कोण म्हणेल?

**रायाजी :** प्रेमाच्या जीवा, तुझ्या मनानें म्हटलें तें जनालाही पटलें आहे! तुझ्या ऐन अमदानीचा अमीर, मराठी अमदानीचा अमीर आहे; तुझ्या सांवळ्या सुरतीचा सरदार, सत्तावीस किल्ल्यांचा सरदार आहे; तुझ्या उमलत्या उमेदीचा उमराव, उमराठ्याचा उमराव आहे; तुझ्या नव्या नवतीचा

नवरंग, या राजेश्वरीचा रणरंग आहे; तुझ्या बढत्या बहारीचा बादशहा, ब्रिरवाडीच्या बहाद्दराचा बेटा आहे! शिवांगीचा शिलेदार, संभाजीराजांचा सेनासागर आहे! जिवा, सिंहगडच्या सिंहाचा छावा–सुभेदार तानाजी मालुसऱ्यांचा रायाजी म्हणून ज्याला म्हणतात तोच, शिवांगी, हा तुझा शिपाई.

**शिवांगी :** उमराव्याचा उमराव, राजेश्वरीचा रणरंग, संभाजीराजांचा सेना-सागर! ( एकदम हुंदका देऊन ) राया–राया, तूं मोठा खोटा आहेस रे! सर्जेराजांच्या नांवासारखीं तुमचीं मोठाली नावें! आपलें मन माझ्यापासून चोरून ठेवून मला भलत्या भरीं पाडलेंस! देवा रे, तुझें पृथ्वीमोलाचें भाग्य या रंक पोरीला कसें रे धार्जिणें होणार! राया, अजून मला आपली म्हणशील का? राया, मला तुझें मोठेंपण लाभेल का रे?

**रायाजी :** मोठेपणाचा मार्ग मरणाच्या मैदानांतून जातो. माझ्या बाबांनीं मालु-सऱ्यांचें नांव सिंहगडावरून स्वर्गावर चढवून दिलें आहे. मालुसऱ्यांचें मोठे नांव मिळविण्यासाठीं, रायाची शिवगंगा त्या रस्त्यानें जाईल का? शिवांगी, रायाचें नांव राखण्यासाठीं जीवाचा मोह तुला सुटेल का? प्रेमानें माझी झालीस—प्यार जिवा–माझ्या धर्मानें तशी माझी होशील का? शिवांगी, माझें मनोगत तुला सांगूं का?

**शिवांगी :** राया,

[ चाल : बा उभा ठेवुनि कर कटीं० ]

कां सख्या शिणविशी अशी। आपुली दासी।
मन होत हिंपुटी*; तसा शीण जीवासी।
तो तुझ्या मुखींचा बोल पडूं दे राया।
पसरीन जिवाचें जाळें त्यासि झेलाया॥ ध्रु०॥
फुलवंती राजसबाळी। तिचा तूं माळी।
जिवलगा तीनही काळीं।
ही माळ धरा हृदयाशीं। वहा देवासी।

---

*हिंपुटी = कष्टी.

परवा न सख्या आम्हांसी ।
देहाची नाहीं माया । जिवाच्या राया ।
शिवगंगा तुमची छाया ।
करुनिया मनाचा रमणा । अहो भगवाना ।
लुटवा या पंचप्राणां ।
तो बोल एकदा बोल, वाहतें आणा ।
तूं सुखी तरी सुख मजला–हा एकच बाणा ॥ १ ॥

**रायाजी :** शिवांगी, आपल्या जीवाचा धडा करून ऐक ! आतांच ऐकिलेंसना, कीं मान्यांनीं आंबराईला वेढा दिला म्हणून ! मासाहेबांना रायगडावर नेण्याची कामगिरी माझ्याकडे आली आहे; संभाजीराजांची ही महाराणी, शिवाजीराजांची ही पुण्याई, मराठ्यांची अब्रू, या नापाक मान्यांच्या हातीं सांपडली तर एकजात मराठेशाहींत मालुसऱ्यांच्या कुळाची, तानाजीबाबांच्या आठवणीची–शिवांगी, तुझ्या रायाच्या नांवाची–नुसती रेवण उडून जाईल ! आतां निभावणीचा एकच रस्ता आहे. या मान्यांनीं अजून मासाहेबांना कधीं पाहिलेलें नाहीं. मासाहेबांच्या सोन्याच्या सांखळ्या पायांत घालून; त्यांचें नांव सांगून, त्यांच्या जागीं तुला उभें राहावें लागेल; भोसलेशाहीच्या सांखळ्यांची खूण पटून, माने तुलाच मासाहेब म्हणून मोऱ्यांसमोर घेऊन जातील आणि आम्ही रायगडावर जाऊं ! पुढें मोऱ्यांनीं तुला ओळखल्यावर, संतापाच्या भरांत सूड घेण्यासाठीं, त्यांनीं तुझ्या देहाची–तुझ्या रायाच्या प्रेमाची –विटंबना करण्याकरितां आपला हात पुढें करितांच—

**शिवांगी :** शिवांगीच्या नशिबा, त्या वेळीं जिवाची सांडणूक कशी करायची एवढें एकदा सांग म्हणजे झालें ! सांग, कोणत्या उपायानें ?

**रायाजी :** शाबास, शाबास, दिलदार जिवा, देवाधर्माच्या नांवानें ! शाबास ! हा पाहा निर्वाणीचा उपाय ! ही सर्जेराजांच्या नांवाची हिऱ्याची आंगठी– माझ्या बहाद्दर प्रेमा, त्या वेळीं पोटांत गिळायची ( आंगठी तिच्या बोटांत घालतो. ) प्रीतीच्या अफाट राज्यांत प्रेमळ वल्लभांनीं, आपल्या प्रेमाची जन्माची खूण राहावी म्हणून प्रियतमांना मुद्रिका दिल्या असतील; पण आपल्या प्रेमाची जन्माची खूण नाहींशी करण्यासाठीं अशी आंगठी आजवर कोणी

कोणाला दिली नसेल! शिवांगी, खरोखरीच माझ्या सांगण्याप्रमाणें तुझ्या हातून घडेल का?

**शिवांगी :** मालिक, तुझ्या मनाची मोडणी करण्यासाठीं का शिवांगीनें तुझ्या नांवाशीं अशी सलगी केली आहे? वेड्या, आम्हां बायकांना सासरचें नांव जोडायला माहेरच्या ममतेचें मूळ तोडावें लागतें. या हिऱ्याच्या तेजानें माझा रस्ता दिसल्यावांचून राहील का? तुझ्या प्रेमासारखें या हिऱ्याचें तेज चमकतें आहे खरें! पाहा बरें नीट!

**रायाजी :** हो, पाहिलें; नीट पाहिलें! (स्वगत) हेंच पाहिलं कीं हिरा पचनीं पडणें कठीण आहे—दुर्दैवी संसारांत प्रेम पचनीं पडणें कठीण आहे!

**शिवांगी :** राया, आतां पुन्हा डोळेभेट कधीं घडायची?

**रायाजी :** लाडक्या जीवा, आतां पुन्हा भेट? पुढल्या जन्मीं!

**शिवांगी :** डोळ्यात आंसू आन् तोंडावर हसूं! लब्राडा, लटकें हसून असें फसवूं नकोस! आधींच आपलें तुला बजावून ठेविते—राया, इतका धीर माझ्यानें मुळींच निघायचा नाही हो! कुडींतून सुटका होतांच, शिवांगीचा अधिरा जीव, उडत्या पांखराच्या पंखांनीं तुझ्याभोंवतीं घिरट्या घालील; घडीपळानें म्हणून तुला विसंबायची नाहीं! राया, दरबारी थाटांत तुझ्या शिरपेचावरची शोभा होईन, मोकळ्या मनाच्या मिजलशींत तुझ्या शराबावरची लाली होईन; शिकारीच्या तळपत्या तापांत माझ्या रायाच्या डोक्यावरतीं घार होईन—ऐन रणाच्या गर्दींत माझ्या रणरंगाच्या राजेश्वरीची धार होईन! पण राया, इतक्या वेळांत पहिल्यासारखा मला विसरणार तर नाहींस ना?

**रायाजी :** तुला विसरेन? एकेका प्राणावर तुझ्या नांवाचें अक्षर गोंदवून, पंचप्राणांच्या प्रभावळींत "श्रीशिवगंगा" जडवून ठेवीन!

**शिवांगी :** राया, माझ्या मरण्यानें तुला इतकें का सुख होणार? किती रे मी दैवाची?

**रायाजी :** मला एकट्यालाच सुख होईल? अल्म मराठेशाही तुला आनंदानें दुवा देईल. उद्यांच्या लग्नांचीं तुझ्या माझ्या नांवांनीं देवकें बसतील; देवि शिवगंगे! तुझ्या प्रेमळ जीवाच्या उदार आधारावर महाराष्ट्रांत गंगायमुना वाहतील! तूं वर गेल्यावर, सुभेदार अभिमानी कौतुकानें तुला राजांसमोर

नेतील; मातोश्री सईबाईसाहेब आंसवांच्या मोत्यांनीं तुझा भांग भरतील; सिंहगडीं, कल्याण दरवाजावर बाबांच्या हातून गतीस मिळालेल्या चंद्रावळी हत्तीवरून सर्जेराजे तुझी मिरवणूक काढतील; तुझा साजशिणगार हेरून माझी जानकीआका भोळ्या आनंदानें गदगदून हसेल; चंद्रावळीवरून माझ्या शिवांगीला मिरवितांना पाहून, ऐरावताची धनीन हेव्यानें ओशाळून खालीं पाहील; तेव्हां आपल्या श्रीजिजाऊसाहेब आपल्या हातीं तुझी दृष्ट काढतील; आणि बाबांचा पवाडा गाणारा तुळशीदास–मंडईच्या बाजारीं असलेला–फणी-आळीच्या फडांत देसाईदेशमुखांसमोर बसलेला–रघु सोनाराच्या घरीं बसलेला–आपला मराठेशाहीचा शाहीर--देवादिकांच्या देखत, गंधर्वांच्या तांड्यासमोर, डफतुणतुण्यांच्या तालासुरांत आणि मराठी बोलांच्या ऐन पुरांत--तुझ्या माझ्या अखेरभेटीचा, जिव्हाळ्याच्या जुन्या गाण्याला जितेपणाच्या जमानें, नव्या धाटणीचा कटिबंध जोडील आणि तुझ्या जिवाच्या पेरणीनें मराठी मनाच्या माळावर मोत्याचें पीक तोडील! ( पाहून ) शिवांगी, त्या पाहा मासाहेब येताहेत; चल, या मराठमोळ्याच्या मायगंगेला प्रणाम करूं! मात्र सोन्याच्या सांखळ्या आपल्या हातीं येईपर्यंत आपल्या आतांच्या वेताबद्दल आधीं त्यांच्यादेखत कांहीं बोलूं नकोस!

[ येसूबाई येतात. ]

**रायाजी :** मासाहेब, ही माझी--ही--ही आपली—

**येसूबाई :** नव्या जाऊबाई ना? सेनासागर, जाऊबाईपेक्षां तुम्हीच जास्त लाजलां! तुम्हांला असे लाजतांना पाहून राजे मनापासून हसले असते! ( तीं दोघें येसूबाईस नमस्कार करतात. ) उदंड आयुष्मान् व्हा.

**रायाजी :** मासाहेब, वडिलांनीं कोरडा आशीर्वाद दिला म्हणजे मुलांचीं मनें विरस होतात. माझी शिवांगी मोठ्या हळव्या जीवाची आहे; माझ्या नव्या नवरीसाठीं मासाहेबांजवळ मी मूलपणानें एका अलंकाराची मागणी करणार आहें. आजवर शिवांगीच्या प्रेमाखेरीज मीं देवाजवळसुद्धां याचना केली नाहीं. तानाजीबाबांचें शुभ झाल्याचें ऐकल्यावर, सर्जेराजांनीं माझ्या आईला सांगून पाठविलें कीं, जसा माझा शंभु, जसा राजाराम, तसाच तिसरा रायबा! त्या दिवसापासून आजतागायत, रायगडच्या रणमर्दांच्या पावलामागें पाऊल

टाकून, या राजेश्वरीच्या रणरंगानें जगाला रामलक्ष्मणांची मराठी जोडी दाखविली! मासाहेब, केल्या कामाची चोरी नाहीं; आज मला माझा मुशाहिरा पाहिजे. तोंडांतून अवाक्षर काढल्यावांचून, मासाहेब माझा बाळहट्ट पुरवाल का?

**येसूबाई :** सेनासागर, अखेर बोलून घालविलेत! आधीं मागायचें तरी होतें! काय पाहिजे तुमच्या नव्या नवरीला?

**रायाजी :** मासाहेब, मी सांगेन त्याप्रमाणें वागण्याबद्दल माझ्या राजेश्वरीची आण वाहा पाहूं!

**येसूबाई :** ( रायाजीच्या तलवारीवर हात ठेवून ) भोंसल्यांच्या भाग्याच्या भांडारावर पहाऱ्यासाठीं तळपणाऱ्या या तुमच्या नागिणीची--मालुसऱ्यांच्या पिढीजात राजेश्वरीची मला ग्वाही आहे.

**रायाजी :** शिवांगी, आपण मिळविलें! मासाहेब,आपल्या पायांतल्या सोन्याच्या सांखळ्या माझ्या शिवांगीसाठीं पाहिजेत!

**येसूबाई :** रायाजी, मी लोभानें म्हणत नाहीं--राजांचे चरण साक्ष आहेत--पण रायगडच्या राणीच्या या सांखळ्या, परक्या पायांना नागिणीचा विळखा घालून विखारी चावा घेतात; यांच्या स्पर्शामुळें, नवथर जीव, देहाची शींव सांडून, देशोधडी लागतो! परवांपावेतों ही सांगायची गोष्ट होती; तुळशीच्या अनुभवानें आमच्या कुळींच्या या कडू कहाणीला खरेपणा आणला आहे.

**रायाजी :** मासाहेब, आपण राजेश्वरीच्या साक्षीनें बोल दिलेला आहे! थोरांना एक गोष्ट दोन तऱ्हांनीं बोलतां येत नाहीं. आतां वेळ सरता होत आहे; मान्यांनीं राईला असा चौगर्द घेरा घातला आहे कीं, उडत्या पांखरालासुद्धां पळवाट मिळायची नाहीं. माने इतक्यांत आपल्या तपासासाठीं इकडे येतील! पण त्यांनीं अजून आपल्याला पाहिलेलें नाहीं; तेवढ्यांत, आपल्या सांखळ्या घालून, औट घटकेसाठीं आपलें नांव लेवून, माझी शिवांगी आपल्या जागीं उभी ठाकेल! शिवांगीच्या जीवापुरत्या सुटकेसाठीं, राजांनीं बाबांना दिलेली हिऱ्याची आंगठी, मुहूर्तावर मीं मघाशींच तिच्या बोटीं घातली आहे! शिवांगीची दुबळी दौलत घडीभर आपण स्वीकारून आमच्या नांवाला पावन करावें! माने खुशाल शिवांगीला घेऊन जातील!

**येसूबाई** : सेवासागर, सेनासागर, निवळ मांगाची करणी केलीत! गोड बोलून माझा गळा गुंतविलात! बाई, काय ग तुझ्या संसाराची परवड ही!

**शिवांगी** : राया, मासाहेब रागावल्या वाटतें? आतां कसें बरें करायचें? थांब, मी घालतें त्यांची समजूत. बाई, माझ्या रायावर अशा रागावूं नका; मासाहेब, आईसारख्या ना तुम्ही मला? मग माझें कां बरें सांगणें मोडायचें? माझा राया अगदीं भोळा आहे हो!

[ येसूबाई शिवांगीला पोटाशीं धरितात. ]

**रायाजी** : मासाहेब, वचनाला बाध आला तर माझ्या राजेश्वरीच्या इज्जतीला बट्टा लागेल!

**येसूबाई** : ती राजेश्वरी नाहीं–पण खाटकाचा सुरा आहे. तिनेंच माझा गळा कापलांत–या भाबड्या, गरीब गाईचा गळा उतरलांत! आणखी असे निर्दयासारखे हसतां आहांत–शुद्ध कसाब, कसाब आहांत!

**रायाजी** : मासाहेब, सोईरसंबंधाच्या गोष्टी व्हायच्या त्या झाल्याच पाहिजेत! आई भवानीच्या साक्षीनें, पहिल्या पिढींत, भोंसल्यामालुसऱ्यांच्या सोयरिकी जमून, सर्जेराजांनीं ही आमची राजेश्वरी सेवाधर्मासाठीं पदरीं घेतली, त्याच वेळीं, या पोरीच्या आंदणासाठीं, मालुसऱ्यांचा औट हातांचा मळा भोंसल्यांच्या नांवें, जिवांच्या मिराशीपासून, कायमदायम तोडून दिला! भोंसल्यांच्या अमंगळाची इडापिडा, व्याहीभेटींत आमच्या भोगवट्याला आली! आमच्या आजच्या विहिणीच्या पायावर विरवल्या रेखाटण्याठीं, शिवांगीच्या रक्ताची सांडणूक व्हायलाच पाहिजे!

**येसूबाई** : *अशा रक्ताभरल्या पावलीं गडावर गेलें तर रायगडाचा रेतीचूर होईल!* मोठेपणाचा कर्मभोग मराठ्यांच्या छत्रपतींवर पावलोंपावलीं ओढवतो आहे! भोंसल्यांच्या खाशांना, ताटाला बसण्यासाठीं, इमानी सोयऱ्यांच्या प्राणाहुति घालून, त्यांच्या पिंडाच्या रगतभातानें आपला पिंड पोसावा लागतो! सेनासागर, तुम्हां सर्वांच्या उपकाराचे, आमच्या पांच पिढ्यांच्या पुण्याईनेंसुद्धां पांग फिटायचे नाहींत!

**रायाजी** : मासाहेब, माने अचानक येऊन थडकले तर मसलत फसेल! सीतामाईनीं लक्ष्मणाच्या बोलण्याचा आव्हेर केला तेव्हां – जाऊं देत, अभद्राची

उजळणी भलत्या वेळीं कशाला हवी ? सोन्याच्या सांखळ्या लौकर काढून द्या ! मासाहेब, आतां माझी, राजांची, धाकट्या राजांची, आण आहे !

[ येसूबाई सांखळ्या काढतात व शिवांगीला देतात. ]

**रायाजी :** ( उघड ) आधी राजेश्वरीची शपथ दिली म्हणूनच ही देवी नवसाला पावली ! ( स्वगत ) शिवांगी, घाल त्या सांखळ्या पायांत !

**शिवांगी :** मला नाहीं बाई जमायचें तें ! राया, तुझ्या प्रेमासाठीं, राजांच्या नांवासाठीं, आणखी एकदा मरायला सांग—पण या सांखळ्या आपल्या हातीं कशा लेतात हें नाहीं मला माहीत ! तूंच ये कसा ! पण तुला पुरुषाला तरी काय कळायचें आहे त्यांत ? बाई, आम्ही आपलीं रानचीं जनावरें आहोंत; तुमच्या नांवानें आम्हांला तरून जायचें आहे. माझ्या रायाच्या पुण्याईनें हीं भूषणें मला लाभलीं; एरवीं बघायलासुद्धां मिळायचीं नाहींत. तुम्हीच आपल्या हातीं घाला पाहूं या सांखळ्या माझ्या पायीं ! राया, बाई सांग बरें तूं एकदा ! येतांना बाई ? राया, बाई जरा हट्टीच आहेत कारे ?

**रायाजी :** ( हसून ) मासाहेब, माफ करा—माझ्या रानफुलाचा रंग जरा भडक आहे; पण वास नाजूक आहे. मनाची मोठी कोवळी जात आहे ही ! आपल्या चरणीं वाहिलें आहे; पूजा कशी तरी साजरी करून घ्या ! तोंडाचा रांगडी राक्षसगण आहे, पण दिल देवगणाचा आहे ! घाला त्या सांखळ्या पायांत !

**येसूबाई :** सेनासागर, शिळारसाच्या रतिबानें मन पोसून, तुम्ही बोलायला शिकलां आहांत ! मी काय बोलूं ? तुमच्या राजेश्वरीनें माझी जीभच कातलेली आहे ! बेटा, ये अशी; नशिबाचा छळवाद व्हायचा तितका झालाच पाहिजे.

[ येसूबाई सांखळ्या घेऊन पुढें होतात. ]

**शिवांगी :** राया, या मासाहेबांच्या सांखळ्या-या पायांत घालूं नयेत ना ? हें बघ या हातांतच घातल्या तर नाहीं का चालायचें ? हें पूजेचें निर्माल्य पायदळीं कसें पाडायचें ?

**रायाजी :** वेडी, माझी भाग्याची वेडी ! देवाचें नांव घे आणि खुशाल सांखळ्या पायांत घाल ! दामाजीवर संकट आलें तेव्हा भक्तासाठीं भगवंतांनीं भणंगाचा वेष घेतला; आज काळाची गंगा उलटी वहात आहे; देवाघरचें सांकडें दूर

करण्यासाठीं आज भिकाऱ्यांनीं भाग्यवंताचें नांव घ्यायचें आहे. सतीचें सोंग घेतल्यावर, पाटावाची परवा ठेवून चालत नाहीं. मासाहेब, उगीच वेळ वाढतो आहे.

**शिवांगी :** खरेंच बाई, घाई करा गडे ! माझा राया इतकें सांगतो आहे–आपण जिवाभावाच्या मैत्रिणी–माझ्या भाग्याची उजरी वेळ--आणि तरी तुझा हात आपला जडच ! रायाला राग येईल बरें !

[ चाल : साजन होरे० ]

साजणि बाई । सजवी मजसि करि घाई ।
लगिनघडि जाई । वेळ आली भरा ।
देव आले घरा । करी चतुराई ॥ १ ॥
साजणि बाई । नटुनि थटुनि ल्वलाही ।
निघतें अगाई । राजराजेश्वरा ।
जवळि याहो जरा । बघिन मुख कांहीं ॥ २ ॥
साजणि बाई । चपळ पळत मन पाहीं ।
जवळ नच राही । मंगलाचे सडे ।
टाकि चोंहींकडे । दावि नवलाई ॥ ३ ॥

[ सांखळ्या घालून होतात. ]

**येसूबाई :** सेनासागर, सांगा आणखी काय करायचें राहिलें आहे तें ! पोरीचें एकेक बोलणें ऐकतांना, आंतड्याला पीळ बसवून जीव तटतटां तुटतो अगदीं ! हं, मीच फिरवूं का सुरा हिच्या मानेवरून ? सेनासागर, काय मांडलें आहे तुम्हीं हें ?

**रायाजी :** मासाहेब, आज माणूसबळ खुंटलें म्हणून बारिंगबळ तुटलें !

**शिवांगी :** राया, या सांखळ्या घातल्या खऱ्या; पण मी राजाच्या राणीसारखी शोभतें तरी का रे !

**रायाजी :** परिसाच्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें झालें ! शिवांगी, आपल्या प्रीतीचा प्रवाह गंगास्वरूप झाला; प्रेमाच्या पोरखेळांतली रायाजीची राणी, मरणाचें मोल देऊन, मराठ्यांची महाराणी झाली ! माझी शिवगंगा-- श्रीमहाराष्ट्रगंगा झाली !

**शिवांगी** : राया, मरतांना मला भीति वाटेल का रे ? पण माझ्या राजेश्वरीच्या रणरंगाला मरणाचा कोण केवा ! बाई, बायकांना मरतांना भीति वाटते काहो ? अगबाई, तुमच्या डोळ्यांला पाणी आलें ! तुम्हांला तरी मीं कशाला विचारलें कुणास ठाऊक ! या आंगठीवर शिवरायांचें नांव आहे आणि रायाच्या जिवाचा भाव आहे; मला वेडीला एवढें कळलें नाहीं, कीं शिवरायांचें नांव तोंडीं असतांना, माझ्या रायाच्या प्रेमाची हिरकणी पोटीं असतांना, मला मरायची भीति ती काय वाटणार ? [ नोकर धावत येतो. ]

**नोकर** : सेनासागर, माने आले--अगदीं जवळ आले !

**रायाजी** : खुशाल येऊं देत-- अगदीं जवळ येऊं देत ! अरे, हें बघ, मासाहेबांना आतां शिवांगी म्हणावयाचें आणि या या आपल्या--वेड्या प्रेमा, आतां बोलतांना थांबूं नकोस. प्रेमाच्या बरळण्याला सगळ्या जगानेंच वेड्यांत काढिलें आहे ! अरे, या आपल्या मासाहेब ! येसूबाईसाहेब, क्षमा करा— माझ्या मरत्या प्रेमाचा हा अखेरचा उमाळा आहे ! ‘ पुंडलिका भेटी परब्रह्म आलें बा ! ’ पण, भक्तराज पुंडलिकानें, मातापितरांची सेवा साधण्यासाठीं, श्रीपांडुरंगस्वरूप परब्रह्माला अठ्ठावीस युगें विटेवर तिष्ठत ठेविलें; महाराष्ट्राच्या मातापितरांच्या नांवांसाठीं, प्रेमस्वरूप परब्रह्मा, हा रायाजी तुला शेवटचा प्रणाम करीत आहे.

[ तिला दंडवत घालितो. नंतर नोकरांसह माने येतो. ]

**माने** : हं, हीच येसूबाई ! सोन्याच्या साखळ्यांनींच अखेर हिला दगा दिला ! काय रे, ही दुसरी कोण ? तो वेडापीर रायाजी कुठें आहे ? आणि तूं कोण आहेस ?

**रायाजी** : ( तलवार उपसून ) तो वेडापीर रायाजी मेला; ही मासाहेबांची दासी शिवांगी; आणि मी कोण हें ही माझी तल—

**माने** : कंगाल, तुझी तलवार राहूं दे तुजजवळ; आम्हांला ही राजाची राणी हवी आहे ! हं, चला रे हिला घेऊन !

[ नोकर शिवांगीला घेऊन जातात. ]

**रायाजी** : अहो, मासाहेबांच्या बरोबर एखादी दासी असूं द्या हो ! या शिवांगीला तरी घेऊन चला !

**माने :** राणीचीच दासी करायला न्यायची आहे. तिथें ही शिवांगी कशाला न्यायची मरायला !

**रायाजी :** बेवकूब ! शिवांगीच्च न्यायची आणि तीसुद्धां मरायलाच्च !

( रायाजी कांहीं वेळ शिवांगीकडे पाहात राहतो. [ तलवाराकडे पाहून ] राजेश्वरी, आपली शिवांगी गेली ! आतां तुमची आमची जनमगांठ !

**येसूबाई :** रायाजी—

**रायाजी :** मासाहेब, आतांच्च सांगितलें--रक्तामांसाचा रायाजी मेला, समशेरी-पुरता सेनासागर काय तो आतां राहिला आहे ! शिवांगीचे पंचप्राण, रायाजीचे दहा प्राण, वैराणांत दाही दिशा वेरून टाकिले ! रायाजीच्या प्रेमाशीं पिढ्या तुटल्या; प्रेमाचीं दोन पांखरें वणव्यांत होरपळून मेलीं ! मासाहेब, चला लौकर. [ सर्व जातात पडदा पडतो. ]

## प्रवेश पांचवा

[ स्थळ : तुळापूरची मोगल छावणी-तुरुंग. पात्र : मांडी घालून
पायांवर हात टाकून बसलेले श्रीसंभाजी महाराज.
भोंवतीं साधारण अंधार. ]

**संभाजी :** ( स्वगत ) मरणाचा कोणाला अनुभव नाहीं म्हणून; पण माझी ही स्थिति म्हणजेच्च मरण असेल का ? कांहीं दिसत नाही, कांहीं भासत नाहीं. विखारलेलें मस्तक सुन्न झाल्यामुळें कांही सुचत नाहीं, आठवत नाहीं, कळत नाहीं ! जीव जड झाला आहे आणि शरीर हलकें वारेमोल झालें आहे.. मी जमिनीशीं खिळून बसलों आहें, कीं वाऱ्यावर वावरतों आहें हेंच उमजत नाही ! अरेरे, हें काय झालें ! मराठ्यांचा राजा मोऱ्यांचा कैदी झाला; वाघाची गरीब गाय झाली; मर्दांचा मातीमोल मुडदा झाला, होत्याचें नव्हतें झालें ! आतां काय व्हायचें राहिलें आहे ? हो, या जित्या मरणाची जाळती जाणीव अजून बाकी आहे ! मेल्या माणसांत आणि जीवन्मृतांत एवढी तफावत.

असते, कीं मेलेल्या माणसाला आपण जिवंत असूनही मेल्यासारखेंच आहोंत अशी जहरी जाणीव मुळींच नसते. हें मरण नाहीं; ही, मरणाहून भयाण, अजून कोणाच्याही अनुभवाला आलेली नाही अशी–मरणाच्या नंतरची जीवदशा आहे ! मग सर्वस्वाचा विसर पाडणाऱ्या मरणानें, माझ्या जीविताचा सुखी शेवट व्हायचा चुकून तसाच राहिला का ? सुखाचें मरण तर नाहीच, पण मरणाचें सुखही या कमनशीब संभाजीला पारखें झालें का ? ( मोठ्यानें ) क्रूर, कठोर काळा ! ये, क्षणभर देवाहून दयाळू होऊन ये आणि माझ्या गळ्यांत आपला बळकट बाहुपाश घाल ! ( पाहून ) कोण आहे तें ?

[ साबाजी बुरखा पांघरून असा येतो व संभाजीराजांचे पाय धरितो. ]

**संभाजी :** कोण आहे ? खरोखरच काळपुरुष माझ्या गळ्यांत मगरमिठी मारण्यासाठीं धावून आला आहे काय ?

**साबाजी :** राजे, ही आपल्या गळ्याशीं काळाची मगरमिठी नाहीं, पण आपल्या पायाच्या चाकराची आपल्या पायाशीं प्रेमाची मिठी आहे.

**संभाजी :** कोण, साबाजी ? ऊठ ! साबाजी, तुझ्या तपोमूर्तीला या पामरासाठीं इतक्या कष्टांत कशाला पाडिलेंस ? या तुझ्या नीच धन्याची सेवा करण्याची हौस अजून फिटली नाहीं का ? माझी आज्ञा शिरसामान्य करण्यापेक्षां, माझा शिरच्छेद करण्याइतका तिटकारा तुला अजून आला नाहीं का ? साबाजी, चल, तुझ्या बिजलीच्या एकाच चमकीनें या संभाजीच्या निर्जीव देहाचा नायनाट करून टाक ! दौलतरावाच्या बेईमानाला कंठस्नान घालून तुझ्या बिजलीनेंच पावन केलें. पोटच्या पोराच्या पापाबद्दलच पक्षपाती होऊन मला परकेपणानें त्या पुण्याईपासून दूर लोटूं नकोस !

**साबाजी :** राजा, तुला मरण देण्यासाठीं मी तुझ्याकडे आलों नाहीं, पण मराठेशाहीसाठीं जीवन मागण्याकरितां आलों आहें. चल, हा बुरखा पांघर, हा परवाना घे-यावर बेगमसाहेबांचा शिक्का आहे. हा दाखविला म्हणजे कुठेंही मज्जाव नाहीं–हा घे आणि इथून बाहेर पड !

**संभाजी :** आणि तूं ? हा तुरुग म्हणजे बळी मिळण्यासाठीं काळानें उघडलेला जबडा आहे !

**साबाजी :** तुला इथें राहून जें करावें लागणार तें मी करीन. तुझें पडेल तें

काम हट्टानें करण्याचा, या तुझ्या साबाजीचा हक्कच नाहीं का ?

**संभाजी :** स्वर्गाला कंटाळलेले देव कारे तुमच्या मनींमानसीं वसतीला उतारा करितात ? अमृताच्या चुळा टाकीत का तुमची रसवंती अवतरत असते ? साबाजी, मेलेल्याला मारण्यांत काय मौज आहे बरें ? तुझ्या भलाईनें मला किती खाली पाहावयाला लावणार ? तुला येथें काळाच्या तोंडांत लोटून मी चालता होऊं ? तुझ्या पवित्र प्राणांच्या मोबदल्यानें या कवडीमोल शरीराचा सांभाळ करूं ? अरे, अगदीं रौरवाचे रहिवाशीसुद्धां माझ्या शेजाराचा किळस करतील ! साबाजी, संभाजीचें मस्तक अजून मोगलांनीं उडविलें नाहीं ! तें ठिकाणीं आहे. अशा राक्षसी रीतीनें वांचण्यापेक्षां मला मरणाचें महत्त्व जास्त वाटतें.

**साबाजी :** लाख मरोत पण लाखांचा पोशिंदा न मरो ! राजा, तुझ्या हुकमाच्या एकेका बोलाबरोबर मोहरलेल्या झाडांना साबाजी लागतील ! खिडखोऱ्यांतल्या दगडांचे देव होतील ! साबाजी आतां मेला काय आणि जगला काय ! आधींच आंखडलेल्या नाड्यांनीं बांधलेलें हें शरीर बेडीनें जखडलें तर त्यांत काय नुकसान होणार ? या हाडांच्या सांपळ्यांतून जिवाचें सावज सुटलें तर सुखी होऊन जाईल ! उलट, तुझ्या मूर्तीकडे सारी मराठेशाही डोळे लावून बसली आहे ! तुझ्याविणे आईभवानीची पूजा थांबली आहे ! या जित्य मुडद्याची पायरी करून तिच्या मंदिरांत पाऊल टाक; नाहीं म्हणशील तर या पांढऱ्या केसांची शपथ आहे.

**संभाजी :** साबाजी, अगदीं वेडा नव्हेस का ? आईभवानीची पूजा बांधायला तुझ्यासारखीं कल्पवृक्षाचीं फुलें टाकून माझ्यासारखे निर्जीव दगड का गोळा करायचे ! साबाजी, असं बोलून आतां मला लाजवूं नकोस ! या संभाजीच्या छातीनें एकदा दगडांशीं धडका दिल्या, पण आज नुसत्या बोलाफुलांनी माझा दिल फाटून जात आहे. माझ्या हातून आतां काय होणार ? तो सभाजी मरणावांचून मेला, आणि हा संभाजी जिवावांचून जगत आहे. जिवांत जीवपण नाहीं, देहांत देहपण नाहीं, नुसतें संभाजी हें नांव राहिलें !

**साबाजी :** राजा, नको रे नको असें बोलूं ! जे तुझ्या नुसत्या नांवीं आहे तें आमच्या गांवींसुद्धां नाहीं.

**संभाजी :** गांव वाहून गेलें, नांव राहून गेलें. माझ्या नांवाचा डंका वाजतो

आहे तो थोडा झाला का ? साबाजी, नेत्या पुरुषाची जबाबदारी मला न कळल्यामुळें, मीं मराठेशाही मातीला मिळविली; बाळाजी चिटणिसासारख्यांना हत्तीच्या पायांखालीं तुडविलें, आणि कब्जीसारख्या कंगालाला डोक्यावर नाचविलें. माझें नांव ऐकल्याबरोबर जातीचा मराठा कानावर हात ठेवील.

**साबाजी :** तुझें नांव ! रामनामानें नुसते डोंगर तरले; पण राजा, तुझ्या नांवानें, मराठेशाहीच्या छत्रपतीच्या नांवानें, नऊ खंड पृथ्वी उद्धरून जाईल. दुर्गादेवीच्या दुष्काळांत मेलेले जीव तुझ्या नांवाच्या संजीवनी मंत्रानें पुन्हा सजीव झाले असते; तुझ्या बिरुदावळींतल्या एकेका बोलाला वेदवाक्याची योग्यता आहे. तुझें नांव घेऊन मृत्युयोगावर बाहेर पडणाराला अमृताच्या वेळा लाभतील. ऐक, राजा तुझें नांव नीट ऐक. गोब्राह्मणप्रतिपालक हिंदुपद-पादशहा श्रीमंत छत्रपति संभाजीमहाराज !

**संभाजी :** गोब्राह्मणप्रतिपालक हिंदुपदपादशहा श्रीमंत छत्रपति संभाजीमहाराज ! नाहीं, साबाजी, ही माझी किताबत नाहीं ! संभाजी हा म्हणजे केवळ रंडीबाज छाकटा ! काशीची गंगा आणि रामेश्वरचा सागर एकवटून छत्रपतींनीं बांधिलेल्या राष्ट्रतीर्थाची—श्रीगंगासागराची ज्यानें व्यभिचाराच्या दिवाणखान्यांतली मोरी बनवली तो हा संभाजी ! वैराग्याच्या वेगानें फडफडणाऱ्या भगव्या झेंड्याला दारुबाजाचें तोंड पुसण्याचा दस्तरुमाल केला ! महाराष्ट्रलक्ष्मीच्या वैभवाचा जरीपटका फाडून त्याची रांडेसाठीं काचोळी केली ! साबाजी, माझ्या नऊ वर्षांच्या नांवलौकिकाची इमारत नीटपणें पाहा ! चिटणिसाला हत्तीच्या पाया-खालीं तुडवून तिचा पाया घातला. मातोश्री सोयराबाईसाहेबांना जितेपणीं भिंतींत चिणून तिच्या भिंती उभारल्या; ती पातकी इमारत उंचावतां उंचा-वतां कळसाला पोंचण्यापूर्वीच कोसळून तिच्याखालीं संभाजीचा चुराडा होऊन गेला. साबाजी, मी बाहेर पडून लोकांना काय तोंड दाखवूं ? आपला राजा सुटला असें पाहतांच, माझी प्रजा आपखुषीनें देश सोडून हद्दपार होईल. साबाजी, या काळोखांतसुद्धां मला तोंड लपवावेंसें वाटतें. खालीं पाहीन तर हत्तीच्या पायांनीं पाताळापर्यंत गाडलेला बाळाजी पुन्हा जमिनींतून वर येईल अशी भीति वाटते. भोंवतालीं पाहिलें, तर कोपऱ्याकोपऱ्यांतून आई-साहेबांचे डोळे माझ्याकडे टवकारून पाहतील. वर पाहिलें तर शिरक्यांचीं

उडविलेलीं शिरें आकाशांतून जयद्रथाच्या मस्तकांप्रमाणें येऊन माझ्या मस्तकावर आदळतील! साबाजी, मी आतां कोणीकडे पाहूं? सह्याद्रीचा सिंह आतां अगदीं भयभीत झाला आहे.

**साबाजी :** राजा, धीर धर. कल्पनेच्या काहुरानें मराठेशाहीचा मोहरा–रायगडचा रणमर्द–भ्याला हें कोणाला कसें सांगायचें?

**संभाजी :** रायगडावर उभा राहून साऱ्या मराठेशाहीला ओरडून सांग, कीं मराठेशाहीचा मोहरा नामोहरम झाला; रायगडचा रणमर्द मनाचा नामर्द ठरला. मातेला मरण दिलें; प्रजा म्हणजे पोटच्या पोरासारखी–कन्येशीं व्यभिचार केला. देवीसारख्या पत्नीचा राक्षसाप्रमाणें छळ केला. सर्वांना जाऊन माझा शेवटचा प्रणाम सांग. महाराष्ट्रांत, महाराष्ट्राच्या राजाला तोंड दाखवायला कुठेंही जागा नाहीं! आबासाहेबांच्या सर्व मराठे वीरांना या संभाजीचा शेवटचा प्रणाम सांग. आणि सरतेशेवटीं, महाराष्ट्रलक्ष्मीच्या मंगल मंदिराला–मराठेशाहीच्या माहेरघराला–दक्षिणच्या दुर्गदेवाला–राजांच्या रायबाला–त्या श्रीमान् रायगडाला माझा दंडवत सांग. त्याला हात जोडून सांग, कीं संभाजी मोकळा असता तर तुझा भ्रष्ट केलेला गंगासागर त्यानें आपल्या रक्तानें आणि आंसवांनीं भरून काढिला असता.

**साबाजी :** राजा, तुझ्या एका शब्दासरशीं ही मोकळीक तुला मिळणार आहे.

**संभाजी :** ही मोकळीक! या मोकळिकीनें मी साताजन्मांचा बांधला जाईन.

**साबाजी :** महाराज, अशी माझी निराशा करूं नका! तुमच्या पायांवर मस्तक ठेवून माझ्या पंचप्राणांची शपथ घालून—

**संभाजी :** साबाजी, असा अविचार मी तुला करूं देणार नाहीं. तूं मस्तक वांकवायचें तें माझ्यापुढें नाहीं, तर तुझ्यासारख्या सेवकांना खऱ्याखुऱ्या धनीपणानें साजून दिसणाऱ्या—साबाजी, ती पाहा! शिवछत्रपतींची तसबीर! तो पाहा एकेक अस्मानतारा तुटून त्यांच्या प्रभावळींत शोभूं लागला, तो पाहा बिरवाडीचा ल्दवय्या–तो हिरडस मावळचा हिरा–साबाजी, या वीरांच्या तेजानें माझे डोळे दिपून जात आहेत. इकडे पाहूं का तिकडे पाहूं असें मला झालें आहे; आणि साबाजी, ही पाहा, माझ्या राक्षसी रागानें मारलेल्या माणसांची सारी भुतावळ जागी होऊन राजांजवळ दाद मागण्यासाठीं जमा

झाली आहे. मेलेल्या जीवांनो, क्षमा करा. तुमच्या केविलवाण्या नजरेनें माझीं पातकें राजांजवळ सांगूं नका! साबाजी, ते पाहा, राजे रागानें माझ्याकडे पाहूं लागले! गोब्राह्मणप्रतिपालक हिंदुपदपादशहा श्रीमंत छत्रपति शिवाजीमहाराज, या पातक्याला क्षमा करा. आबा, आपल्या चुकल्या बाळाला क्षमा करा. साबाजी, आबांच्या नजरेची मला भीति वाटते. साबाजी, मी कुणीकडे तोंड लपवूं? साबाजी, मला सांभाळ रे!

**साबाजी :** बेटा, असा रडूं नकोस! महाराष्ट्राच्या मूर्तिमंत पराक्रमा, तूं हिंमतीनें हसायला लाग; तुझ्याबरोबर सह्याद्रीवरच्या फत्तराफत्तराला फुलें येऊन तीं हसायला लागतील! तुझ्या जुन्या नोकराच्या गळ्याची शपथ आहे माझ्याकरितां एकदा तरी हांस पाहूं—

**संभाजी :** ( हसून ) विराट संसाराचें हसें झालें, तिथें काय हसायचें?

**साबाजी :** राजा, काय भेसूर हें हसणें! तुझ्या रडण्यापेक्षांहि हें भेसूर आहे! या हसण्याकडे पाहिलें तर माझी म्हाताऱ्याचीच काय, पण साक्षात् रायगडचीसुद्धां कडेकोट कंबर खचून जाईल! राजा, लहानपणींच्या मोकळ्या आनंदानें एकदा हांस! तूं चार वर्षांचा बच्चा होतास – डोळे पाण्यानें भरून आल्यामुळें त्या वेळचें गोंडस बाळ आज डोळ्यासमोर दिसत नाहीं – शिकारखान्यांतल्या एका वाघाच्या पिंजऱ्यासमोर तुला खेळवीत असताना माझी नजर दुसरीकडे लागून तूं पिंजऱ्याच्या जवळ गेलास, त्यासरशीं वाघानें तुझ्या हातांवर पंजा मारला. तूं जरासा मागें सरलास; तुझ्या चिमुकल्या हातांतून कोंवळ्या रक्ताचे ओघळ वाहात होते; पण तिकडे तुझें लक्षसुद्धां गेलें नाहीं! मागें सरकल्यामुळें किंचित् हलणारे कपाळावरचे ते कुरळे केस, विजयमुद्रेनें लकाकणारे ते चिमणे डोळे, तोंडावरची ती लबाड भीति, वाघाच्या गुरकावण्याला वेडावण्यासाठीं गोल वळविलेले ओठ; त्या वेळेस किती मनापासून हसलास! बेटा, तसा एकदा हांस पाहूं! तुला राजांच्या पायाची शपथ—

**संभाजी :** साबाजी, आबासाहेब अजून माझ्याकडे रागाच्या नजरेनें पाहात आहेत. त्या रागानें जळून जाईन अशी मला भीति वाटते. साबाजी, मला सांभाळून घे. साबाजी, आबांना पुन्हा आठवण करून दे. त्यांनींच तुला सांगितलें होतें ना – आबांना म्हणावें, शंभूबाळ अजून हूड आहे; त्याच्याकडे

असें रागानें पाहूं नका. आबासाहेब, आपण असें रागानें पाहूं लागलां म्हणजे आपल्या या लाडक्या शंभूबाळानें तोंड कुठें लपवावें ? मी काय करूं ? आबासाहेब, अजून तरी माझ्या बाळबुद्धीला रस्ता दाखवा. आपल्यासारख्या लोकोत्तर अवताराला सद्गुरु रामदासांचा उपदेश घ्यावासा वाटला, मग या चुकलेल्या बाळाला–साबाजी, ती पहा श्रीसमर्थांची भव्य मूर्ति ! साऱ्या राज्याच्या सनदा काढून आबांनीं समर्थांच्या झोळींत टाकल्या. राजानें बैराग्याला भीक घातली. साबाजी, खरा शिष्य, खरा सद्गुरु ! हाच राजसंन्यास ! एकाचा राजसंन्यास, दुसऱ्याचा योगसंन्यास ! दोघांतून मोठा कोण ? ( एकदम ) साबाजी, लहान तोंडीं मोठा घांस घेतला, आबासाहेब, आतां अजून रागाच्या नजरेनें पाहण्याचें कांहीं कारण नाहीं. अशा राजसंन्यासात मला दर्शन देण्याचा आपला हेतु समजला. माझ्या अयोग्य मस्तकावर आपला जिरेटोप अजून आहे. त्याचा मीं अजून संन्यास केला नाहीं—थांबा, आबासाहेब, पाहा, संभाजीवर सूड घेण्यासाठीं तळमळणाऱ्या जीवात्म्यांनो, क्षणभर शांत व्हा. साबाजी, तुमच्या चरणीं प्रत्यक्ष शिवछत्रपतींनीं मस्तक ठेविलें आहे. श्रीसमर्थांच्या साक्षीनें आबासाहेबांच्या डोळ्यांदेखत मराठेशाहीचा हा जिरेटोप साबाजी छत्रपतींच्या मस्तक स्पर्शानें पवित्र झालेल्या तुमच्या तीर्थस्वरूप चरणीं अर्पण करीत आहें. हा नेऊन, माझ्या धाकट्या भावाच्या–सोयराबाईसाहेब, ऐका–आईसाहेबांच्या राजारामाच्या — उद्यांच्या तुमच्या श्रीराजाराममहाराजांच्या मस्तकावर ठेवा. शंभूदादाचा राजबाळाला आशीर्वाद सांगा. महाराष्ट्राच्या महाराजाला या कमनशीब मराठ्याचा रामराम सांगा. उद्याच्या उगवत्या सूर्याला या मावळत्या सूर्याचीं शेवटचीं किरणें नेऊन पोहोंचवा; आणि रायगडच्या जुन्या राजाची नव्या राजाला शेवटची एवढीच वाणी ऐकवा कीं, **राजा म्हणजे जगाचा उपभोगशून्य स्वामी ! राज्य-उपभोग म्हणजे राजसंन्यास ! ना विष्णुः पृथिवीपतिः** [ जिरेटोप पायांवर ठेवतो. पडदा पडतो. ]

ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥

श्रीगीतोपनिषत्सु-श्रीभगवान्

*अंक पांचवा समाप्त*